# THE BOOK WAS DRENCHED

# जागती ज्योत

## गद्यपद्यात्मक नाटक

लेखक

भार्गवराम विठ्ठल वरेरकर

प्रथमावृत्ती

---

एप्रिल, १९३३

---

किंमत एक रुपया.

---

बॉम्बे बुकडेपो, गिरगांव.

प्रकाशकः—

दत्ताराम रामकृष्ण देऊळकर,

मॅनेजिंग प्रोप्रायटर, बॉम्बे

बुकडेपो, गिरगांव, मुंबई



## लेखकाचीं इतर पुस्तकें.



**नाटकें.**

कुंजविहारी
संजीवनी
सरस्वती
वरवर्णिनी
चंद्रशेखर ( समर्थ भिकारी )
हाच मुलाचा बाप
लयाचा लग्न ( नर केसरी )
संन्याशाचा संसार
सत्तेचे गुलाम
पतित पावन ( तुरुंगाच्या दारांत )
नवा खेळ
करग्रहण
करीन ती पूर्व
सोन्याचा कळस
स्वयं सेवक
बिल्वमंगल

**लघु नाटकें.**

पापी पुण्य
संसार
सेविका

**कादंबऱ्या.**

चिमणी
विधवा कुमारी
धांवता धोटा
गोदू गोखले
कुलदैवत



मुद्रकः—

एस्. व्ही. परुळेकर, मुंबई वैभव प्रेस, सँडहर्स्टरोड, गिरगांव–मुंबई.

# प्रास्ताविक

प्रस्तुत नाटकाचा विषय महाराष्ट्रीय बहुजनसमाजाला बराचसा अपरिचित आहे असें म्हटलें तरी अनुचित होणार नाहीं. कॉटन मार्केटमध्यें खेळणाऱ्या व्यापाऱ्यांत महाराष्ट्रीयांची संख्या अगदीं अल्प आहे. व्यापारी जीवनाच्या दृष्टीनेंही महाराष्ट्रीय मागासलेलेच आहेत. तरीही व्यापाऱ्यांच्या निरनिराळ्या पेढ्यांवर किंवा सेक्रेटरीयट-सारख्या बड्या सरकारी ऑफिसांत कारकुनी करणाऱ्यांचें जीवनही वरिष्ठांच्या अनुषंगानें गृहसौख्याला पारखें झालेलें आहे. तेवढ्यापुरती तरी या विषयाची जाणीव महाराष्ट्रीय प्रेक्षक-वाचकाला पारखी भासणार नाहीं.

यांतील दुसरा जो पोटविषय आहे, तो मात्र साऱ्याच महाराष्ट्रीयांच्या जिव्हाळ्याचा आहे. आंखफरकावर खेळणाऱ्यांची संख्या महाराष्ट्रीयांत भरपूर आहे. तेवढ्यापुरता तरी नाट्यवस्तूचा हा पोटभाग आमच्या प्रेक्षक–वाचकांना आकर्षक होईल.

कपाशीच्या व्यवहारांतील आडवे तिडवे सांदी कोपरे मला बरेचसे अपरिचित होते. त्यांचा अभ्यास करण्याच्या कामीं माझे मित्र राजारामपंत नेरलीकर यांचे बहुमोल सहाय्य झालें.

स्त्रियांच्या भूमिका स्त्रियानीं कराव्या, या तत्वासाठीं आज मीं बरींच वर्षे झगडत आहें. त्याबद्दल माझी थट्टाही होत आहे. पण दिवसेंदिवस हें तत्व अमलांत येण्याचीं लक्षणें कितीतरी आशास्पद वाटूं लागलीं आहेत. या तत्वाच्या समर्थनासाठींच हें नाटक लिहिलें गेलें आहे. तें बसविण्याचे कामीं हिराबाई प्रभृति भगिनीत्रय आणि त्यांच्या कर्तृत्ववान मातुश्री ताराबाई माने यानीं जो उत्साह दाखविला आणि जे परिश्रम केले, ते माझ्या या तत्वाच्या समर्थनाला पोषक झाल्याचें प्रेक्षकांना दिसून येईल अशी मला आशा आहे. विद्यालयाचे डायरेक्टर नानासाहेब हर्डीकर यांनीं प्रोडयूसर या नात्यानें बजाविलेली कामगिरी तितकीच महत्वाची आहे. विद्यालयाकडे पूर्वीचीं जीं नाटकें आहेत त्यांच्यापेक्षां प्रस्तुत नाटकाचें रंगतंत्र अगदींच भिन्न स्वरूपांचें असल्यानें त्यांच्या अकृत्रिम सहकार्यावांचून हें नाटक रंगभूमीवर सुव्यवस्थित स्वरूपांत येणें अशक्य झालें असतें.

नाटकांतील पदांच्या कांहीं चाली विद्यालयाचे एक घटक सुरेशबाबू यांनीं व कांहीं दिनकर ढेरे यांनीं दिल्या आहेत. पण ज्या एका विशिष्ट प्रकारच्या चाली भावनात्मकतेच्या दृष्टीनें पाहिजे होत्या, त्यांची अचुक निवड करून संगीतशुद्ध बसविण्याच्या कामीं विष्णुपंत पागनीस यांनीं घेतलेले परिश्रम बिनमोल आहेत.

या नाटकांत पुनः एकदां शेवटीं ' राष्ट्रगीत ' घातलें आहे. या बाबतींतले पूर्वींचे पेंढारकर यांचे प्रयत्न फुकट गेले. ' राष्ट्रगीत ' सुरू होतांच एक क्षणाची कळ सोसून उभें राहण्याइतकें राष्ट्रीयत्व महाराष्ट्रीयांत आहे, असें या भगिनीत्रयांच्या स्वरसौंदर्याच्या आकर्षकतेनें तरी ठरलें जावो.

८२, तुळशी बिल्डिंग
मुंबई ८–४–३३. } भार्गवराम विठ्ठल वरेरकर



ता० ८ एप्रिल १९३३ रोजीं या नाटकाचा पहिला प्रयोग न्यू एल्फिन्स्टन थिएटरांत झाला. त्यावेळी खालील नटी आणि नटांनीं भूमिका घेतल्या होत्या.

---

**विजया**-- हिराबाई बडोदेकर.

**कुंदा**— कमलाबाई बडोदेकर.

**वरदा**— सरस्वती माने.

**चिंगी**-- कुसुम.

**विश्वनाथ**-- रंगराव वामनराव देशपांडे.

**सर्वोत्तम**-- वासुदेव काशिनाथ परचुरे.

**बाबासाहेब**--कृष्णाजी सखाराम हर्डीकर.

**नंदू**-- दिनकर पांडुरंग ढेरे.

**जयवंत**— दत्तात्रय विश्वनाथ जोशी.

**सदोबा**-- गुरुनाथ दत्तात्रय जोशी.

**आचारी**-- शंकर धोंडो करंदीकर.

**२ गृहस्थ**— { भगवान दामोदर कऱ्हाते.
जयकुमार दामोदर कऱ्हाते.

**फोटोग्राफर**--अनंतराव राजाध्यक्ष रेक्स स्टुडिओ.

---

या नाटकाच्या सजावटीसाठीं एका विशिष्ट प्रकारचीं स्त्रियांची पादत्राणें प्रचारांत आणलीं आहेत तीं गिरगांवातील 'ईस्टर्न लेदर वर्क्स' चे चव्हाण ब्रदर्स यांनीं बनविलीं आहेत.

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# जागती ज्योत

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

[ विजया दिव्याजवळ एक पत्र लिहित बसली आहे. वरदा दुसऱ्या कोपऱ्यांत पुस्तक वाचित बसली आहे. बाहेर कुणी भिकारी खालील अभंग पेटी व टाळ यांच्या साथींत म्हणत आहे. ]

**अभंग.**

**कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥**
**दीननाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नको पाहुं केलें पापपुण्य ॥**
**पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार उद्धरीले ॥**
**तुकयाबंधू म्हणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥**

**विजया**—काय ग वरदा, ऐकूं येतं आहे का तुला ? केव्हांचा तो भिकारी ओरडतो आहे-त्याला भिक्षा नाहीं का घालायची ?

**वरदा**—अवश्य भिक्षा घालायची ! ऐकूं येतं आहे-मलाही ऐकूं येतं आहे, तसंच तुलाही ऐकूं येतं आहे. घरची मालकीण तूं-मी घटकाभर पाहुणी म्हणून आलें मला कसली इथं सत्ता ? बरा अभंग म्हणतो आहे-मी कशाला त्याला लावून देऊं ? तुला त्रास होत असेल तर जा आणि घाल त्याला भिक्षा ! (बाहेर गाणारा थांबतो) ऐकलंस ? तो थांबला. आतां ऊठ पाहूं. पाहातेस काय माझ्याकडे ?

**विजया**— किती फाजिल झाली आहेस ग तूं ? एका शब्दाला किती उत्तरं दिलींस ! ( उठून पाहून ) गेला वाटतं तो ? भिकारी दारांतून विन्मुख गेला ! कांहीं वाटतं का तुला ?

**वरदा**—कांहीं वाटतं का तुला ? घर तुझं-कुणाला कांहीं वाटायचं असलं तर तें तुला-मला नव्हे. घर कांहीं माझं नव्हे !

**विजया**—कितीवेळ तुझंमाझं करून हिणवशील ? इतक्या दिवस तूं इथं येते आहेस-मी कधीं परकीपणा दाखवला आहे का ? हें माझं, हें तुझं, असा प्रपंच कधीं केला आहे का ? आणि तूं नाहीं का इथं सत्ता गाजवित ? हंसतेस काय ? निर्लज्ज ! अशी लाज सोडलीस-उमेट झालीस तर कोण पत्करील का तुला ? अजून तुझं लग्न व्हायचं आहे--

**वरदा**—आणि तुझंही लग्न अजून व्हायचं आहे ! अशी ऐदी बनलीस, स्वतःच्या कामासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहूं लागलीस तर कुणी शहाणा पत्करील का तुला ?

**विजया**—मी तशीच राहीन-कुणी शहाणा नको माझ्यावर सत्ता गाजवायला !

**वरदा**—तूं पुष्कळ नको म्हणशील-पण तुझ्या वडिलांनीं आधींच तरतूद करून ठेवली आहे ना ? अगदीं पाळण्याला बाशिंग जरी बांधलं नाहीं तरी असा अजाणपणीं केलेला वाङ्निश्चय मी तरी पत्करला नसता.

**विजया**—नुसतं वडिलांनीं ठरवलं एवढ्याचसाठीं कांहीं मी हो म्हटलं नाहीं. काय त्यांत वाईट झालं आहे ? काय जात दुसरी आहे, कीं दरिद्री आहे, कीं मतं जुळत नाहींत ? सारं कांहीं मनासारखं आहे. म्हणूनच ना लोकांचे डोळे फुटतात ? म्हणूनच ना तुला हा असा हेवा वाटतो ?—

**वरदा**—हेवा वाटतो ? आणि मला ? ( हंसते ) काय तें ध्यान ? असला गंवडी नवरा--

**विजया**--गंवडी ? अग तो इंजिनीयर आहे--

**वरदा**--म्हणजे घरं बांधणाराच ना ? गंवडी काय करतात ? घरंच ना बांधतात? इंग्रजी शिकला, इंजिनियरिंग कॉलेजांत गेला, पास झाला, बी. ई. झाला-तरी धंदा गंवड्याचा ! मी नाहीं कधीं असला गंवडी पत्करायची !

**विजया**--हंः ! मग तुझी कुणावर आहे नजर ?

**वरदा**--अजून कुठं आली आहे मला नजर ? अजून नजर यायला तुझ्याइतकं तरी वय झालं पाहिजे ? बरं आमचे बाबा-काय पण आमचे बाबा ! त्यांनीं तरी वाङ्निश्चय ठरवावा ?-पण अजून माझ्या लग्नाचं नावसुद्धां काढीत नाहींत. कुणी विचारलं तर म्हणतात-हंः-काय म्हणतात ?--( हंसते ).

**विजया**—काय म्हणतात तुझे बाबा ?

**वरदा**—बाबा म्हणतात, आमची वरदा अगदीं लहान आहे. निदान विजये-इतकं तरी तिचं वय झाल्याशिवाय–

**विजया**—माझ्याइतकं ?

**वरदा**—हो–तुझ्याइतकं वय झाल्याशिवाय कांहीं लग्नाची गोष्ट बोलायची नाहीं. शिवाय तो कुत्रा—

**विजया**—कुत्रा ! कुठला कुत्रा ?

**वरदा**—तो–ग्रंथकार-कवी–संपादक–साहित्यिक-फिलॉसफर–

**विजया**—कोण ? नंदू का ?–( हंसते ) त्याचं काय ? त्यानं टाकला आहे का अर्ज ?

**वरदा**—अर्ज ? नुसता अर्ज ? झोळी घेऊन राहिला आहे ना दारीं ! आतांच्या त्या भिकाऱ्यासारखा. तो भिकारी तुझ्या ऐदीपणामुळं विन्मुख गेला आणि–

**नंदू**—( प्रवेश करून ) हा भिकारी–वरदे, हा भिकारी, हा भिकारी एकदां विन्मुख गेला तरी दहादां परत येईल.

**वरदा**—आणि दहादां परत आला तरी तसाच विन्मुख जाईल. केरसुणी आहे का ओळखीची ? कीं देऊं तिची पाठीला ओळख घालून ?

**विजया**—वरदा, कांहीं माणसुकी आहे का तुला ? पोरीच्या जातीनं अगदीं ताटाखालचं मांजर होऊन राहावं असं जरी मला वाटत नाहीं, तरीदेखील हा असला द्राष्टपणा—

**नंदू**—आतां पहाना तुह्मीच ! चांगला पुरुषासारखा पुरुष मी–आणि ही कारटी मला केरसुणी दाखवते ! उद्यां लग्न तर होऊं दे–

**वरदा**—कुणाशीं ?

**नंदू**—कुणाशींही ! हें पहा वरदे, पुरुषांची जात इथून तिथून सारी सारखीच. कुणी बोलून दाखवतात तर कुणी आंतल्या गांठीचे असतात. पण स्त्रीजातीचा प्रश्न आला, कीं पुरुष तेवढा प्रत्येक टायरंट–जुलमी बादशहा ! म्हणून म्हणतों, पौरुषाचा अभिमान सोडलेला माझ्यासारखा कवी–

**वरदा**—ग्रंथकार, संपादक, देशभक्त, हिंदुसभाइट, वेदांतवादी, साम्राज्यवादी, समतावादी, ध्येयवादी आणखीही कसला तरी वादी प्रतिवादी–भयंकर मद्रासी वेंकटरमणा—

**नंदू**--अरे हो-हो-हो-हो-मला बोलूं तरी देशील कीं नाहीं ?

**वरदा**--नाहीं.

**नंदू**--कां नाहीं ?

**वरदा**--तुह्मी पुरुष आहांत !-

**नंदू**--आतां काय करणार ? आहें पुरुष-त्याला कांहीं इलाज नाहीं. हें पहा विजयाबाई, मी पुरुष आहें म्हणून ही मला हिणवते, पण पुरुषासाठींच ना ईश्वरानं हें जग निर्माण केलं ? ईश्वर तरी पुरुषच आहे ना ? आदिपुरुष-नारायण-नरनारायण-

**वरदा**—मादीनारायण नव्हे वाटतं ?

**विजया**—वरदे, देवाचीसुद्धां थट्टा करतेस ?

**वरदा**—कां करूं नये ? जो उठला तो तो देव म्हणतो ! देवाची दया म्हणतो ! देवीची कृपा-देवीची मर्जी-म्हणताहेत का कुणी ? देवसुद्धां मेला पुरुष ! अशी चीड येते या पुरुषांची ! हातीं सत्ता मिळाली म्हणून सारं जग पुरुषांच्या नावानं भारून ठेवलं आहे मेल्यांनीं !

**नंदू**—वरदे, प्रमिलेचं राज्य स्थापन करणार आहेस वाटतं ? पण संभाळ हो-तिथं एकदां अर्जुन घुसेल-दे माय धरणी ठाय करील-मग पायावर लोळण घेशील त्याच्या-

**विजया**—नंदू, हें असलं मीसुद्धां ऐकून घ्यायची नाहीं बरं. वरदेसारखा बोलभांडपणा मला करायचा नाहीं. पण या अर्जुनी पौरुषाच्या बढाया कुणी मिरवूं लागला, तर त्याला पायानं पाणी पाजण्याची धमक मलासुद्धां आहे म्हणावं—

**वरदा**—छान ! असा पायपोस दिला पाहिजे ! अशी ये वाटेवर. असंच जर तुझं पाठबळ मला मिळालं, तर आपण दोघी एका क्षणांत साऱ्या पुरुषजातीला पायापाशीं आणूं—

**नंदू**—अग, मग त्याला एवढा अट्टाहास कशाला ? मी वाटेल तेव्हां तुझ्या पायाशीं यायला तयार आहें ना ?

**वरदा**—तूं ? हंः ! तुला आहे का कांहीं आपलेपणा ? पायाशीं लोळण घ्यायला लावायला तितकींच अभिमानाचीं माणसं असावीं लागतात.

**विजया**—त्याच्याशीं कसला वाद घालतेस ? मुद्देसुद वाद म्हणजे कांहीं तरळती कविता नव्हे. काहीं तरी अस्पष्ट, अंधुक, अर्थशून्य, विलग्न रचना म्हणजे

या असल्या कवींचा कलाविलास ! त्याच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. जगाच्या कठोर व्यवहारासाठीं तोंड द्यायला आपल्याला सज्ज व्हायचं आहे. तिथं हीं तरळतीं काव्यं आणि हुरळते कवि–दोन्हीं कुचकामाचेच !

**नंदू**—ठीक आहे. काव्य सोडून दिलं. आतां कोणत्या नात्यानं बोलूं तुम्हां लोकांशीं ? राजकारण पाहिजे-कीं अर्थशास्त्र पाहिजे ? आपल्याकडे वाटेल त्याची तयारी आहे.

**वरदा**—माझी देखील तयारी आहे—

**नंदू**—कसली ? लग्न करायची ?

**वरदा**—नव्हे–तुझ्यासारख्या सर्वज्ञ मूर्खाचा असा कान पकडून त्याला घराबाहेर घालवून द्यायची–( बाबासाहेब येतात. )

**बाबा**—वरू–वरू-पोरी, काय हें ? अगदींच ताळ सोडलास की ! सोड त्याचा कान.

**नंदू**—नको–कान तसाच धरून ठेव–पण मला बाहेर मात्र घालवून देऊं नकोस !

**बाबा**—सोड–सोड त्याचा कान ! ( ती कान सोडते ) काय वेड्यांचा बाजार आहे ! आणि विजू, तूं देखील उघड्या डोळ्यांनीं पाहात हंसते आहेस ?

**विजया**—आतां हसूं नको तर काय करूं ?

**बाबा**—काय करूं म्हणजे ? तिला आवरून धर. सामोपचाराच्या चार गोष्टी सांग.

**विजया**—तिला ? तीच उलट मला चार गोष्टी सुनावील.

**नंदू**—खरं आहे. कान धरले तर त्याचं कांहीं वाटत नाहीं–कांहीं वाटत नाहीं कसं ?–उलट बरं वाटतं ! पण तिचं तें तोंड सुटलं कीं जीव कासावीस होतो.

**बाबा**—विजू, हें बरं नव्हे. तूं तिला जरा लगाम घातला पाहिजेस. मी हा असा–कुणालाच मला आवरतां येत नाहीं, म्हणून ना मी हिला तुझ्याकडे मुद्दाम पाठवतों ? आतां सुमी आहे–पण हिचं तिचं मुळींच पटत नाहीं. दोघी बहिणी–पण क्षणभर सुद्धां एका सुरांत बोलत नाहींत. शिवाय ती संसारी बायको–नवरा आहे–तो तसा अगदीं अरेराव नाहीं म्हणा, पण किती झालं तरी तो नवरा !

तूं अजून स्वतंत्र आहेस. नातंगोतं नसलं तरी तुझ्याबद्दल आपलेपणा वाटतो. म्हणून माझ्या सुमेपेक्षां मी तुला अधिक लेखतों. एवढ्यासाठींच हिला तुझ्या सहवासांत राहायला सांगतों. म्हटलं, कांहीं तुझा शहाणपणा संगतीसोबतीनं तरी हिच्याठायीं येईल. पण पाहातों, तों तूंच हिला उत्तेजन देते आहेस ! दुर्दैव माझं नि काय ?

**विजया**—असं कां म्हणतां बाबासाहेब ? मला पहिल्यापासूनच तिचा फार ळळा ! मला आवडतं !—तिचं हें उद्धटपणसुद्धां मला आवडतं. नव्हे, असं वाटतं, हिची तडफ जर मला येईल—

**वरदा**—तडफ ? कसली आली आहे तडफ ? प्रामाणिकपणा म्हणजे कांहीं तडफ नव्हे. मनांत येतं तें सरळ सरळ बोलून दाखवित असतें, याला जर तुला तडफ म्हणायची असेल तर खुशाल म्हण. कां हो, कविराज, दांतखिळी कां बसली ? कांहीं बोलायचं नसेल तर वाट सुधारा पाहूं.

**नंदू**—कवि म्हणतेस ? काय दुर्दैव ! मी सारं काव्य सोडून दिलं असं मघाशींच नाहीं का जाहिर केलं ? काव्य सोडलं, त्याबरोबरच स्फूर्तिही गेली. आतां तसाच प्रसंग आल्याशिवाय मला पुनः कवि होतां येत नाहीं.

**बाबा**—हें पहा नंदू, तूं या पोरींच्या नादीं लागूं नकोस. कांहीं उद्योगधंदा आधीं पहा. काव्यं करून कांहीं पोट भरत नाहीं किंवा व्याख्यानं देऊन भुकेची आग शांत होत नाहीं. अविवाहित पोरींच्या मागून फिरायच्या पूर्वीं आधीं प्रपंचापुरतं कांहीं मिळवायला शीक. जा बेटा, जा पाहूं आतां.

**वरदा**—वाः, तरी म्हटलं माझे बाबा आहेत ! नाहीं विजू, तुला नाहीं वाटत—माझे बाबा माझ्याइतकेच सडेतोड आहेत असं नाहीं तुला वाटत ?

**नंदू**—तिला वाटायच्यापूर्वीं मला पटलं बरं चांगलं ! काय करूं ? गेलों असतों, पण आज जेवायची कुठं सोय नाहीं. रात्र होत आली आहे. विजयाबाईनीं आग्रह केला तर घेईन म्हणतों पाहुणचार !

**बाबा**—जेवायचीच काळजी असेल तर चल माझ्याबरोबर—

**वरदा**—म्हणजे ? याला घेणार पंक्तीला ?

**नंदू**—तेंही खरंच ! कारण वाघाच्यासमोर बांधलेल्या बोकडानं कधीं सुखासमाधानांत चारा खाल्ला आहे ? तरीही पण ही भुकेची आग मोठी कठिण आहे—

**बाबा**—चल तर-आणि तूंही चल ग-वरू, फतकल मारून कशाला बसली आहेस ? तुला नाहीं वाटतं भूक लागत ?

**वरदा**—श्रीमंतांच्या पोरींना अन्नद्वेष होत असतो-भूक कुठली बिचाऱ्यांना ? असं वाटतं-मरावं आणि भिकाऱ्याच्या पोटीं जन्माला यावं, म्हणजे हा तुमचा जाच तरी सुटेल.

**बाबा**—म्हणे जाच ! रात्रीची वेळ-तुला सोबत करावी म्हणून आलों-तर कृतघ्न कार्टी त्याला जाच म्हणते ! अरे पण ही-( कुंदा येते ) सुमी कां आली या वेळीं ?

**वरदा**--तिला सुमी म्हणायचं नाहीं बाबा. आतां त्या सौभाग्यवती कुंदा-बाई आहेत.

**कुंदा**--निघालांत वाटतं ? मला जरा वेळच झाला यायला-आज मेल डे ना ? घरीं यायला वेळ होईल-म्हटलं, विजूकडे घटकाभर जावं—

**नंदू**--मग निघायचं ना ? जेवण थंड होईल.

**वरदा**—भुकाळू मेला ! चला बाबा, या माझ्या ताईला कांहीं मी आवडत नाहीं. कशाला उगीच मैत्रिणींच्या मधें या. काय म्हणते पहा-निघालांत का ? एव्हां कुठं चाललांत-जाऊं बरोबर-असं कांहीं म्हणत नाहीं. चला, कशाला उगीच आमचा अडथळा. ( जाते. )

**बाबा**--चल रे बाबा-नाहींतर एकटीच जायची तणतणत. ठीक चाललं आहे ना सुमे ? येतों बरं विजे-चलरे-( नंदू व बाबासाहेब जातात. )

**कुंदा**—गेले ! बरं झालं—

**विजया**—खरंच बरं झालं. संध्याकाळपासून सारखी टकळी लावली होती तिनं. म्हटलं, केव्हां जाते एकदा. आली म्हणजे असं वाटतं-पण एक दिवस नाहीं आली तर मेला जीव अगदीं खालवर होतो. पत्रसुद्धां पुरं करूं दिलं नाहीं हा वेळपावेतों.

**कुंदा**--करमणूक नाहीं ना तुला ? उद्यां लग्न झालं म्हणजे नाहीं असं वाटायचं. मग वरदा रस्त्यावर दिसली तर दाराला खीळ देशील. माझं तर नांवसुद्धां घेणार नाहींस.

**विजया**--पण तूं यावेळीं इकडे कशी ?

**कुंदा**--सांगितलं ना ? घरीं येणं इतक्यांत व्हायचं नाहीं-पण खोटं कशाला बोलूं ? विजय, आज माझं मन अगदीं अस्वस्थ झालं-कारण म्हटलं तर कांहीं

नाहीं–पण जीव कसा अगदीं बावरल्यासारखा झाला. उगीच हुरहुर वाटूं लागली. घरीं कुणी नाहीं, बोलायचं कुणाशीं ? बजी मोलकरणीशीं का ? हल्लीं हें असं चाललं आहे ! दोनदोन दिवस गांठभेट होत नाहीं. कापडबाजारांत खळबळ चालली आहे म्हणायचं ! इथं माझ्या जिवाच्या खळबळीला कोण विचारतं.

( भूप—त्रिताल. )

**हरघडी गांजि मनाला ॥ हरित मान, पतिनिधान । जरि हंसला । जिव फसला । दिसला, सुख ना हृदया, जगिं या ॥ धृ० ॥ झाली आस उदास विचरतां । भान न राहे तुटली ममता । समता हारितां विनया ॥ १ ॥**

**विजया**--सुमे, नव्हे कुंदाबाई--

**कुंदा**--हें बघ–तूं देखील त्या फाजिल वरूसारखी हिणवूं नकोस. लग्न झाल्यावर नांव बदलायचं हें ठरलेलंच आहे. पण अशीं मुद्दाम कुणी डोळ्यांत बोटं घालून दाखवून दिलं, कीं तेंच मनाला खाऊं लागतं.

**विजया**--मग आतां कोणत्या नांवानं हाक मारूं, तें एकदां नक्की सांग पाहूं. तूं माझ्यापेक्षां वयानं लहान–पण अघाडी मारलीस. माझ्या आधींच सौभाग्यवती झालीस. प्रपंचाच्या कसोटींत माझ्याहून मोठी ठरलीस. सुमे म्हटलं तर तुझ्या पतिराजांना वाईट वाटायचं, नुसती कुंदा कसं म्हणूं ? कुंदाबाई म्हटलं तर परकी-पणाचा भास होऊं लागतो. मेल्या एका लग्नामुळं केवढी उलटापालट होते ही ?

**कुंदा**--आनंद आहे तो याच उलटापालटींत बरं विजय. आज तुला कळायचं नाहीं. तुझं लग्न काय, ठरलेलंच आहे. नुसतं नांव बदलायचं–नि घर बदलायच तेवढं राहिलं आहे. आतां तुला घराला काय तोटा म्हणा ! इंजीनियर पतिराज–

**विजय**---अग, पण माझं हें स्वतःचं घर आहे ना ? हें का टाकून चालणार आहे ?

**कुंदा**--तर काय आतां नंबुद्री बायकांसारखा नवरा घरीं आणणार आहेस ?

**विश्वनाथ**--( प्र. क. ) आणणार कां ? हा आला–अगदीं आपल्या पायांनीं चालत,–दावं लावल्याशिवाय, काढणी लावल्याशिवाय, अगदीं आपखुषीनं–घराचं माहेर करून बायकोचं सासर करायला, हा आला पहा !

**विजया**—नको त्यावेळीं यायची खोडच आहे तुझी विसू.

**कुंदा**--विसू ? अजून विसू म्हणतेस ?

**विजया**--अजून कां ? केव्हांही झालं तरी मी विसूच म्हणणार. तुमच्यासारखीं आम्हीं नांवं नाहीं बदलणार कीं अहोजाहोही नाहीं म्हणणार.

**विश्वनाथ**--हें पहा कुंदाबाई, आम्हीं नव्या काळची नवीं माणसं. ते जुनेपुराणे आचार आतां कुणालाच पटत नाहींत. 'येणं झालं, म्हणायचं झालं डोक्याला घालायचं पागोटं नि पायांत घालायचा जोडा' असली उखाण्याची भाषा चालवायचा तुम्हीं कितीही अट्टाहास केला, तरी त्या अधांत्री भाषेची आतां समाप्तीच होणार.

**विजया**--बरं--ही न सांगतां भलत्याच वेळीं यायची रीत केव्हां समाप्त होणार?

**कुंदा**--अग लग्न झाल्यावर !

**विश्व**--खरं आहे. त्यावेळीं सांगणं न सांगणं ही भाषाच मुळीं राहणार नाहीं. वेळ अवेळ हा प्रश्नसुद्धां येणार नाहीं. काळवेळाचं परिमाण संपल्यावर नव्याजुन्या काळाच्या एकीकरणाबरोबर सुकाळ दुकाळही सारखेच व्हायचे.

( **भीमपलास**--झपताल. )

**जनिं विजनिं नव-काल । छाया वितरि दावि,**
**मायावि मधुजाल ॥ ध्रु० ॥ युवति-रुचि-गुणपाश ।**
**नर-भाव-मुकुलास । करि सदा चवचाल ॥ १ ॥**

काय ? मी ह्मणतों हें खरं ना ?

**विजया**--असं यापूर्वी वाटत होतं. पण लग्न झालेल्या जोडप्यांतून एकाद्याला टाकून दुसरं आपल्या उद्योगधंद्यामागं लागलेलं पाहिलं, कीं वाटतं--

**कुंदा**--हें बरं नाहीं बरं विजू--

**विश्व**--काय वाटतं ?

**विजया**--वाटतं, कीं लग्न करण्यापूर्वी आधीं थोडा जास्त विचार करावा.

**विश्व**--आतां विचार करीत किती दिवस राहणार विजू ? ही सुमी--नव्हे या कुंदाबाई, तुझ्यापेक्षां वयानं लहान, चांगली चार वर्षांनीं लहान--तिचं लग्न झालं. सर्वोत्तमरावांसारखा कापडाचा बडा व्यापारी--उत्तमांतला उत्तम नवरा हिनं पटकावला--

**कुंदा**--मत्सर वाटतो का ?

**विश्व०**--मला ? मला कां मत्सर वाटेल ? मला थोडाच नवरा पाहिजे आहे ? वरदा असती तर तिनं सांगितलं असतं काय तें ! किती झालं तरी मी गवंडी ! हंसतेस काय सुमे-नव्हे कुंदाबाई.

**कुंदा**—तुम्हीं लोकं अशी हीं खोडाखोडी करूं लागलांत, कीं वाटतं, लग्न केलं हें पाप केलं. मेला नांवांत सुद्धां परकेपणा !

**विश्व०**—आहे ना ? ही खोडाखोडी कुणी केली ? माहेरच्या मस्टर रोलवरचं नांव सासरच्या यादींत कांहीं चालत नाहीं. आतां विजूचं नांव काय ठेवावं याचा विचार करतों आहें.

**विजया**--दुसरा काय उद्योग आहे ? नुसतीं दुसऱ्यांच्या पोरींना नावं ठेवायचीं. पण ध्यानांत ठेव विसू, मी त्यांतली नाहीं बरं.

( **यमन**—त्रिताल. )

**नाहीं भय मज या मना। प्राण कठिण करितां**
**अबला राहिल ॥ धृ० ॥ राहि युवति परिकरा वराया।**
**प्राणनाथ मानिल्या जना। काय हृदय-रहिता सतता**
**साहिल ॥ १ ॥**

लग्न झालं म्हणजे माझं जसं रूप बदलणार नाहीं तसं नांवही बदलणार नाहीं. नांवारूपांत बदल करणं भाग पडेल तर असल्या लग्नाची मी काडीभरही पर्वा करणार नाहीं.

**कुंदा** - ऐकलंस विसूभाऊ ? या अटीवर पत्करायचं आहे. पूर्वीचा वाङ्निश्चय झाला आहे वडिलांकरवीं-पण आतां लग्न लागायचं आहे मुलामुलींचं. त्यांचं त्यांना पटलं पाहिजे.

**विश्व०**—पाहिलीस-कशी आजीबाईसारखी बोलते आहे ? लग्न झालं कीं एवढ्याशा चिमुरड्या पोरीला सु[illegible] आपोआप पोक्तपणा येऊं लागतो—

**विजया**—आणि मुलांना ? पुरुषांना ?

**विश्व०**—त्यांचं कांहीं नांव बदलत नाहीं कीं गांवही बदलत नाहीं. आधींचीच जाणिव असते नवरेपणाची--

**कुंदा**--खरं आहे. पण हें आम्हां बायकांना पूर्वी कळत नसतं.

**विश्व०**--हा बेसूर सूर आज कुठला आणला आहेस ? आल्यापासून पाहातों आहें, तों तुझा सूर असा बेसूर येतो आहे. विजयादेखील त्यामुळं बिथरलेली दिसते आहे.

**विजया**--हा परिणाम भुकेचा. भूक लागली आहे ना सर्वांना ?

**विश्व०**--कसली ? अन्नाची कीं प्रेमाची ?

**विजया**--सुमेचं लग्न झालेलं-तिच्याकडे प्रेमाचा प्रश्नच नाहीं. माझं ठरलेलं-एकूण एकच. तेव्हां प्रेमाच्या भुकेचा प्रश्नच मिटला. आतां राहातां राहिलं जेवण-

**आचारी**--( प्र. क. ) जेवण तयार आहे.

**विजया**--तिघांचंही का ? पाहातोस काय ? होय म्हण ना ! ( तो हंसत जातो. ) मी फोन करतें सर्वोत्तमरावांना. तूं आजची रात्र इथंच राहा. विसूलाही मग बोलायला संकोच वाटायचा नाहीं. खरं ना ?

**विश्व०**--मला केव्हांच संकोच वाटत नाहीं-पण तेवढ्यासाठींच हिला ठेवून घेतां येत असेल, तर माझा होकार आहे.

**कुंदा**--झाली नवेरशाहीला सुरवात ! ऐक विजू, होकार येऊं लागला. आतां पुढं नकार येऊं लागतील. ( पडदा. )

---

## प्रवेश दुसरा

( अपॉलो स्ट्रीटवर सदोबा आणि जयवंत प्र. क. )

**सदोबा**—अरे, थांब म्हणतों ना ! घाई कसली एवढी ? मोटर इंजीनियर झालास म्हणून कांहीं एवढं पळत सुटायला नको. आम्हीं आपलीं बैठीं माणसं. बैठीं कसलीं ?-तासाचे तास उभं रहावं लागतं दुकानांत. त्यामुळं चालायची संवय पायांना पारखी झालेली. तुझं आपलं बरं आहे जयवंत, केव्हांही मोटारी फुकट्या वापरायला मिळतात, म्हणून अशी पळापळ लागली आहे तुझ्या पायांना—

**जयवंत**--तुझ्या पायांना विश्रांति पाहिजे असेल तर एक दिवस तुला देतों

एक चांगला लिफ्ट-चांगला जुहूपर्यंत चार सहा फेऱ्या घालून आणतों-मग तरी होईल ना तुझं समाधान ?

**सदोबा**--समाधान होईल खरं-पण केव्हां ? जायला मिळेल तेव्हां ना ? आमच्या शेटचा स्वभाव तुला चांगलाच माहित आहे. तुझे मामाच नव्हे का ते ?

**जयवंत**--मामा नव्हेत-आतेभाऊ.

**सदोबा**--मामा काय-मामेभाऊ काय-किं आतेभाऊ काय-कांहीं तरी नातं आहे ना ? येऊन जाऊन तूं असतोसच कीं नाहीं त्यांच्या घरीं ?-तेव्हां त्यांचा स्वभाव तुला चांगलाच माहित आहे. बेटा मर मर मरत असतो. लाखांच्या पुंज्या झाल्या आहेत, पण अजून हांव सुटत नाहीं. काय करायचे आहेत एवढे पैसे कमावून ? एकटा जीव सदाशिव—

**जयवंत**—खरंच, तो एकटा जीव आणि तूं सदाशिव. एकटा जीव कसा म्हणतोस वेड्या ? लग्न झालं आहे ना ? चांगली चांदणीसारखी बायको घरीं आहे. उद्यां नक्षत्रांसारखा परिवार वाढत जाईल.-लाखांची हिस्सेरशी होईल ! आणि असं पहा सदोबा, पैसा कुणाला नको आहे ? पैसा म्हणजे दारू*आहे. एकदां घशाला चटक लागली, कीं दारू जशी एका पेगवर थांबत नाहीं, तसाच पैशाचा पेला एकदां खिशांत उतरला, कीं खिशाची तहान घशासारखी वाढूं लागते. आणि पैसा मिळत असला तर कुणी मिळवूं नये का ? सारेच कांहीं तुझ्या-माझ्यासारखे दरिद्री नसतात !

**सदोबा**—तें खरं आहे. पण यांच्या लाखांसाठीं आमची खाक कां करतात ? चांगली सोन्यासारखी बायको घरीं-पण लेकाचा दोन दोन दिवस कानाला फोन लावून दुकानांत असतो. मग लग्न कशाला केलं बेट्यानं ? खरं सांगू जयवंत, मला तिची मोठी दया येते. अगदींच घरीं एकटी असते बिचारी ! तूं तरी तिला सोबत करीत जा.

**जय**--मी ? अरे वेड्या, बायकांना सोबत करायला कुणी तरी बायकोच असावी लागते--

**सदोबा**--होय ना ? मग तूंही लग्न कर. ती तुझी आत्या--

**जय**--आत्या नव्हे-आतेभावजई-नुसती वहिनीच म्हणेनास !

**सदोबा**—आत्या काय-भावजई काय-एकच. तूं जर लग्न केलंस तर तुझ्या बायकोला ठेव त्यांच्याच घरीं. नणंदा-भावजया सुखासमाधानानं राहतील-

**जय**—नणंदाभावजया नव्हे–जावा जावा–

**सदोबा**--बरं–जावाजावा–हीं नात्यांची कोडीं आपल्याला उकलत नाहींत बुवा. जावाजावा घरीं राहतील–बिचारीला सोबत होईल–आणि तुलाही उनाडायला सांपडेल मोटारी उडवीत !

**जय**--एकूण काय, आमच्या फुकट्या मोटारी सलतात तुझ्या डोळ्यांत! बाबारे, एकदां येऊन पहा आमच्या कारखान्यांत, चार दिवस काम कर–पुन्हां मोटारीचं नांवसुद्धां घेणार नाहींस. तुझं कापडदुकानच ठीक वाटेल तुला.

**सदोबा**--तेहीं खरं आहे. हें बघ, आमच्या धंद्यांत एक मोठं सुख आहे. गिऱ्हाइकी नुसती पुरुषांचीच नसते ! तेवढंच समाधान आहे पहा या साऱ्या दगदगींत. आम्ही हे असे फटिंगभाई–धाब्यावर शेज आणि खाणावळींत पेज. खाणावळ कसली ? हल्लीं चार आण्याच्या प्लेटींची सोय झाली आहे ना ? केव्हां तरी जायचं आणि चार घांस गिळून यायचं. या जन्मीं तरी कांहीं लग्नाचा चान्स दिसत नाहीं–

**जय**—कां नाहीं ? आपण कांहीं साहेबलोक नव्हे ! हिंदूच्या जातींत इतर कांहीं वाटेल त्या अडचणी असल्या, तरी लग्नाची सोय अति उत्तम ! बाप नुसता मुलीच्या लग्नासाठीं मरत असतो. भिकारी का असेना, पण मुलीला एकदांचा नवरा मिळाला म्हणजे त्याचे बेचाळीस पूर्वज स्वर्गाला जातात.

**सदोबा**—मी कांहीं बाप नव्हे–आणि मला बाप व्हायचंही नाहीं आणि तीं मुलीच्या लग्नाची भगभगही नको आपल्याला ! आपला एकटा जीव सदाशीव आहे तो बरा आहे. हें आमच्या शेटचं पाहातोंच आहें ! बायको घरीं एकटी मरते–पण गडगंज ऐश्वर्य तरी आहे घरीं. आमची बायको काय करणार घरीं ? आमचे शेट चोविस तास मरत असतात म्हणून आम्हांलाही मरावं लागतं. ते लाख कमावतात, पण खाक होते आमची. तेव्हां म्हटलं लग्न करून कुणाच्या तरी पोरीला संकटांत कां घाला ? नको बाबा, हें आहे हें बरं आहे ! तुझं तसं नाहीं. आपली बायकोला फिरवशील मोटारींतून—

**जय**—आणि काम केव्हां करणार कारखान्यांत ? बायकोला मोटारींतून फिरवित बसण्यासाठीं कांहीं पगार मिळत नसतो !

**सदोबा**--हो–तेंही खरं. हें लग्न म्हणजे मोठं कोडं आहे बघ. त्या बिचारीची दशा पाहून मला दया येते. हडळीसारखी घरीं एकटी पडलेली असते. घर खायला

येत असेल बिचारीला. घटकाभर ज्यांना घरीं बैठक मारतां येत नाहीं, ते हे लोक कशाला लग्न करतात ?

**सर्वोत्तम**--( प्र. क. ) कुणाच्या लग्नाचं चाललं आहे रे सदोबा ? तुझं ठरतं आहे वाटतं लग्न ? आणि हा कोण ? जयवंत वाटतं ? काय रे, हल्लीं आम्हांला अगदीं बॉयकॉट घातला आहेस जसा !

**जय०**-कां ? गेल्या आठवड्यांत तीन वेळ घरीं येऊन गेलों. पण तुम्हींच नव्हतां घरीं. कुंदावहिनीहीं कुठंशी गेली होती.

**सर्वो०**--हो-तेंही खरंच. हा आठवडा मोठा धास्तीचा आहे. त्या कोमागाटा कैशानं आमच्याशीं टक्कर लावली आहे ना ? डावावर डाव टाकावे लागताहेत. व्यापार तर केला पाहिजे ! हे बेटे जपानी म्हणजे सैतान आहेत. कसा या किंमतींत यांना माल परवडतो, तेंच कळत नाहीं. होझिअरीचे भाव कुठल्या कुठं नेऊन टाकले आहेत बेट्यांनीं ! अगदीं मरायची पाळी आली आहे. या सदुलाच विचार ना !

**सदोबा**—हो-हो-तें काय विचारावं ? रुपयाची चवली झाली आहे बरं जयवंत! शेट म्हणून निभावून नेताहेत. एक घडीसुद्धां टेलिफोन खालीं ठेवीत नाहींत कपाशीचं तें तसं-कापडाचं हें असं-काय करणार ?-चोवीस तास मरावं, तेव्हां कुठं दमडीदुगाणी दिसते तुझं आपलं बरं आहे जयवंत. महिन्याकाठीं उक्ता पगार. आम्हांला तरी तसा मिळता-

**जय**—हें पहा सर्वोत्तमदादा, या बोलायच्या गोष्टी आहेत. कुणी नाहीं महिन्याच्या पगारावर खूष असत ! तुम्हाला करायचे असतात सट्टे-पण चांगला हबका बसला तर तुम्हाला दुप्पट जोर येतो. आमच्या काबाडकष्टांत कांहीं लाखांची कमाई नसते- बोला झालं ! ऐकून घेतोंच आहोंत आम्ही.

**सर्वो**--तेंही खरं. मोठा कैफ आहे हा ! धरतां येत नाहीं, सोडतां येत नाहीं. वादळांतल्या बोटीसारखं जिणं आहे आम्हा लोकांचं. हें पहा सदू, तूं घरीं जा, तिला सांग, म्हणावं आज मला घरीं येतां येत नाहीं.

**सदोबा**--दुसऱ्या कुणाला पाठवा. तूंच जाऊन सांग जयंवत. हा निरोप आपण तरी जाऊन सांगणार नाहीं बुवा.

**सर्वो०**--तें कांहीं नाहीं-तूंच गेलं पाहिजेस. मी सांगतों आहें ! काय ? मी सांगतों आहें.



**सखाराम**—या सदूलाच विचार ना !  ( अंक-१ प्रवेश-२ )

**सदोबा**--( जयवंताला ) ही नोकरी बरं ! ( सर्वोत्तमला ) निरोप सांगेन-पण बाईना नाहीं सांगणार. आचाऱ्याला सांगेन किंवा बजी मोलकरणीला सांगेन. मग त्यांचीं तीं पाहून घेतील. ( जातो. )

**सर्वो०**--मोठं वाईट जिणं हें ! काय करायचं ? तारूं लोटलं आहे खरं-किनारा गांठायची या जन्मीं तरी आशा नाहीं. तुम्हां लोकाचं फार बरं-इनसॉल्व्हन्सीची भीती नाहीं. एक नोकरी सुटली तर दुसरी मिळते-पण ही उलट्या पगडीची भीती मोठी भयंकर.

**जय०**--हें पहा-दादा-रागावूं नका. पण वहिनीनं घरीं एकटं काय करावं ?

**सर्वो०**--असं पहा-तूं येऊन आमच्याच घरीं राहा. किती दिवस खाणावळींत काढशील ?

**जय०**--तें एव्हां जुळायचं नाहीं दादा.

**सर्वो०**--अरे लबाडा !-ठरलं आहे वाटतं कुठं लग्न. अगदीं मला कळूसुद्धां दिलं नाहींस !

**जय०**--तुम्हीं एकदम उड्या मारतां दादा. मी म्हणत होतों, कीं मी एकटा आहें तोंवर आपला माधवाश्रमांतच बरा आहें--

**सर्वो०**-तर मग लग्न कर लवकर. तुझी बायको आली, कीं तिला तरी सोबत होईल. हंसतोस काय ?-तुझ्यासाठीं नव्हे-माझ्यासाठीं-निदान तुझ्या वहिनीसाठीं तरी लवकर लग्न कर. असं पहा-साडू होतोस का माझा ?

**जय०**--अरे बापरे !

**सर्वो०**--कां ? घाबरलास ? अरे, लग्न होईपर्यंतच या नाठाळ पोरींची सारी टुरटुर असते. पुढं कुठल्याकुठं नाहींशा होतात.

**जय०**--त्यांतली दिसत नाहीं ही वरदा !

**सर्वो०**--तें सर्व पुरुषावर असतं. केव्हां चुचकारावं लागतं, तर केव्हां चाबुक हाणावा लागतो. रेसच्या घोडींची जात असते ही ! पण एकदां का रिंगणावर धरल्या, कीं पहिल्या सपाट्याला विन-प्लेससुद्धां नाहीं.

**जय०**—ती रेसची भानगडच नको बुवा आपल्याला. ती महालक्ष्मीची नको-किंवा वरदेसारख्या जगदंबेचीही नको--

**सवा०**--छेः छेः, काय वेड्यासारखा बोलत राहिलों ! तिकडे फोन कोकलत असेल ! हे पहा, तूंही जाऊन तिची समजूत घाल. ओरडते खरी-पण दोष माझा आहे-आणि हें पहा, मुहूर्त जवळ आले आहेत.

**जय०**--हें तुमचं सौख्य पाहिलं, कीं वाटतं, कशाला उगीच दुसऱ्याच्या पोरीला बुडवा !

**सर्वो०**--तेंही खरंच-छेः-पण चाललोंच. तिची समजून घाल बरं. ( जातो. )

**जय०**--हें या या श्रीमंतांचं संसारसौख्य !

( **खंबावती**--एकताल. )

**पतिहितरत सति रंजिस । राहे घरीं ॥ विफल काज । नच इलाज । ती जाया साहिल किती ॥ धृ० ॥**
**प्रेमकामिं जीव मुके । सधन काय राहि सुखं । नरकीं पचते या ॥ १ ॥**

( जातो. )

---

## प्रवेश तिसरा

( कुंदा दिवाणखान्यांत प्रवेश करते व टेलिफोन घेऊन कॉल करते. )

**कुंदा**--हॅलो-हॅलो-कोण ?--हो हो--घरीं नाहींत ?--ठीक !--आल्याबरोबर इकडे पाठवून दे.--जरुरीचं काम आहे म्हणावं ! ( फोन ठेवते तोंच बाबासाहेब येतात. ) कोण ? बाबा ?

**बाबा**--हो-तुझा बाप ! बापाला ओळखायलादेखील इतका वेळ लागतो का तुला ? लग्न झालं म्हणजे बापाची ओळख इतक्या लवकर बुजते, हें नव्हतं मला माहित !

**कुंदा**--काय हें बाबा ? मी फोन करीत होतें-तुमच्याकडे पाठ होती-चटकन् लक्षांत आलं नाहीं म्हणून विचारलं-तर त्याला किती फांटे फोडलेत ?

**बाबा**--माझ्याकडे पाठच फिरवली आहेस आतां. तुला कांहीं वाटतं का ? काल विजयेकडे आपण भेटलों-सहज गांठ पडली म्हणून पडली; पण आपला म्हातारा बाप घरीं पोरीसाठीं विवळत असेल, असं कधीं वाटलं का तुला ? अग, एक दिवस तरी घरीं यायचं. लग्न होऊन दोन वर्षं झालीं, पण दोन आठवडे तरी आलीस का माहेराला ?

**कुंदा**--बाबा--( थांबते. )

**बाबा**--हं-बोल, थांबलीस कां ? काय बनवणार आहेस मला ?

**कुंदा**--आतां बनवणार नाहीं-आजपर्यंत बनवित आलें होतें-पण आज सारें खरंखरं सांगणार आहें.--बाबा, लग्न म्हणजे एक गुलामगिरी आहे बरं!-( थांबते. )

**बाबा**--वाः ! एवढंच का सांगणार होतीस ? अग, हा तर जुनाच सिद्धांत आहे. पुरूषही असंच म्हणतात. पुरूष म्हणतात, कीं लग्नाची बेडी पडली कीं उधळता पुरुष बंदिवान होतो.

**कुंदा**--ढोंग !-शंभर नंबरी ढोंग !-पुरूष बंदिवान होतो म्हणे ! कैदी तुरुंगांत असतो, जेलरही तुरुंगातच असतो; जेलरचा बंदिवास म्हणजे पुरुषांचा बंदिवास. बिचारी लग्नाची बायको म्हणजे मात्र खरी कैदी !

**बाबा**--जेलरचा झाला तरी बंदिवासच ना ?

**कुंदा**--पण तो कैद्याला तुरुंगांत ठेवण्यासाठीं-कैद्याचा छळ करण्यासाठीं-कैद्याचा जीव कैद्याला नकोसा करण्यासाठीं-जन्माच्या कैदेची अंमलबजावणी करण्यासाठीं !

**बाबा**--काय झालं आहे असं ? इतकी चिडली आहेस कां ? तुला वाईट का वागवतात ? छळ का करतात ? सर्वोत्तमराव कांहीं तशा वृत्तीचा दिसत नाहीं.

**कुंदा**--दिसत नाहीं-अगदीं बरोबर आहे-ते तसे दिसत नाहींत. जसे आहेत तसे दिसले असते, तर मला एवढं दुःख झालं नसतं. पण ते तसे दिसत नाहींत, याचीच मला चीड येते. ते तसे दिसत नाहींत, म्हणूनच मला तोंड दाबून बुक्क्यांचा मार झाला आहे. बाहेरून पाहाणारांना माझा हेवा वाटतो. लक्षाधीशाची बायको !-केवढी भाग्याची ?-असं म्हणतात. पण हें उसनं भाग्य !-हें दांभिक भाग्य-आग लावा असल्या या भाग्याला !

**बाबा**--हें पहा, मी आपला आहें एक ओबडधोबड म्हातारा. ही उखाण्याची भाषा कांहीं मला कळत नाहीं. अगदीं सरळ चार वाक्यांत काय सांगायचं तें सांग पाहूं.

**कुंदा**--सरळ सांगू ?-सरळ सांगू ?-ऐका तर. लग्न करून तुम्हीं आपल्या पोटच्या गोळ्याचा गळा कापला आहे--

**बाबा**--यांत विशेष तें काय सांगितलंस ? हें तर मला आधींच माहित आहे. कळूनसवरूनच मी केलं आहे तें !

**कुंदा**--म्हणजे कळून सवरून तुम्हीं माझा गळा कापला आहे ?

**बाबा**--अर्थात् !

**कुंदा**--बाबा !

**बाबा**--हें पहा, मी इतरांसारखा दांभिक बाप नाहीं. खरं तें सांगतों. तूं मोठी वाढलीस म्हणून लोकं बोलूं लागलीं, तेव्हां वराच्या शोधाला लागलों. चांगले पन्नास कार्टे पाहिले-तुला त्यांची माहिती दिली. हा लक्षाधीश, सुशिक्षित, मधुभाषी, म्हणून तूंच पसंत केलास ! होय ना ?-मी सक्ती केली नाहीं ना ?-माझ्या पसंती-साठीं तुला दावं लावलं नाहीं ना ? आतां सांग, कुणी कुणाचा गळा कापला ? ( दोघे स्तब्ध. ) ठीक-हें एक पूर्वी होऊन गेलं. आतां आजची तक्रार काय आहे ती सांग पाहूं ! ( विजया येते ) वाः ! तूं आलीस ? फार छान झालं. हा न्याय द्यायला कुणी तरी न्यायाधीश पाहिजेच होता.

**विजया**--सहज नाहीं आलें मी-तिनं फोन करून मला मुद्दाम बोलावलं.

**बाबा**--असं का ? पण मी आलों तो मात्र सहज आलों. बरं झालं. हं, आतां तुझी फिर्याद मांड पाहूं सुमे ! ( कुंदा स्वस्थ राहाते ) आतां कां बोलत नाहींस ? तसा माझा आग्रह नाहीं. मी नको असलों तर आपली वाट सुधारतों--

**विजया**--नाहीं-तुम्हींही पाहिजेत यावेळीं. कुंदा,-पहा, मी आतां तुला सुमी म्हणणार नाहीं-मला दिसतं आहे, तुझी कांहीं तरी तक्रार आहे. तूं अस्वस्थ झाली आहेस. हृदयाच्या बांधाला पाट फोडल्याशिवाय ही तुझी तळमळ दूर होणार नाहीं. एकदां काय तो मनाचा निश्चय कर आणि सारं कांहीं सांगून टाक पाहूं तुझ्या अनुभवाचा फायदा मिळाला तर मीही सावध होईन.

**कुंदा**--( तिरस्कारानें ) माझा अनुभव ? साऱ्याच बायकांचा अनुभव जर असाच असेल, तर हें जग म्हणजे नरकाचा बाजार आहे, असंच मी म्हणेन--

**बाबा**--हें पहा, पुनः पुनः अशी थांबू नकोस. काय झालं आहे ? सर्वोत्तमरावाला दारूचं व्यसन लागलं आहे ?-नाहीं ?-बाहेरख्याली झाला आहे ? नाहीं ?-रेसीसचा नाद लागला आहे ?-नाहीं ?-मग यापेक्षां वाईट तें काय झाल आहे ?

**कुंदा**—यापेक्षां कांहीं वाईट आहे, असं तुम्हां लोकांना जोंपर्यंत वाटत नाहीं, तोंपर्यंत बोलून तरी काय करायचं ?

**बाबा**—हा नुसता आततायीपणा आहे ! असलं बोलणं वरदेला शोभतं. तूं तिच्यापेक्षां समजूतदार आहेस-म्हणजे ती मूर्ख आहे असं नव्हे-पण ती बेफाम आहे. तूं सहनशील आहेस—

**कुंदा**—म्हणूनच ना एवढं सहन करतें आहें ?

**विजया**—मग काय तें सांगून टाक पाहूं एकदा. मला देखील मोठी तळमळ लागली आहे ( सदोबा येतो ) या सदोबा, कसं काय चाललं आहे ?

**सदोबा**—चालायचं काय म्हणा ? आलों म्हणजे काय ? सुखासमाधानानं कांहीं आलों नाहीं. हुकुमाचा ताबेदार म्हणून आलों आहें. नोकरी पत्करली आहे ना ? चार टोपल्या उचलाव्या तेव्हां ना पोटाला मिळणार ?

**बाबा**—मग अशी काय सुरी कुणी ठेवली आहे तुझ्या मानेवर ?

**सदोबा**—सुरीच नव्हे तर काय ? रोज रोज यायचं आणि आज शेट येत नाहींत म्हणून बाईसाहेबांना सांगायचं मोठं जिवावर येतं.

**कुंदा**—ऐकलंत ? हेंच तें !

**बाबा**--कायरे सद्या, येत नाहीं म्हणून जें तुझा हा शेट सांगतो, तो जातो रे कुठं?

**सदोबा**--कुठं जाताहेत ? जातील कुठंतरी, तर बरे, मी म्हणतों. पण त्या टेलिफोनशीं लग्न लागलं आहे ना त्यांचं ?--

**कुंदा**—ऐका. त्यांचं टेलिफोनशीं लग्न लागलं आहे-माझ्याशीं नव्हे !

**सदोबा**—पण आज मात्र टेलिफोन नव्हे. आज तो सेशूयी कामिमुरा आला आहे. मोठीं जोराचीं खलबतं चाललीं आहेत. कड्याकुलपं लावून दोघेही बसले आहेत बघा—

**कुंदा**—जा–निरोप पोंचला म्हणून सांग जा.

**बाबा**—अशी काय वस्वस् करतेस ? त्याला बोलूं दे ना !

**कुंदा**—आतां काय बोलायचं राहिलं आहे ? येणार नाहीं म्हणून सांगायचं, तें सांगून झालं–चालता हो पाहूं–( सदोबा जाऊं लागतो. )

**बाबा**—अरे ए रवळ्या, थांब जरा. कुठं जाणार आहेस आतां ?

**कुंदा**—दुसऱ्या कुठं ? मसणांत !

**सदोबा**—अगदीं खरोखर मसणांत ! तो झोटिंग आणि मी खवीस त्यांचा कान टेलिफोनला आणि माझे डोळे त्यांच्या तोंडाकडे. बसतों सारी रात्र त्या मसणांत. दुसरं नसतंच कुणी तिथं. मर्जी आहे ना माझ्यावर ?

**कुंदा**—निघ पाहूं इथनं–मोठा आला आहे मर्जीतला ! ( सदोबा पाय काढतो. ) हा आला कीं समजावंच. येणार नाहींत–येणार नाहींत ! मग कशाला लग्न केलं यांनीं ? बायको झाली म्हणजे तिला जीव नसतो का ? ( विजयेला ) पाहातेस काय माझ्या तोंडाकडे ? राक्षस असतात बरं हे पुरुष ! माझ्यावरून धडा घे आणि तूं तरी सावध हो.

**विजया**—खरं बोलायचं म्हणशील तर मला कांहींसुद्धां कळलं नाहीं.

**कुंदा**—नाहींच कळायचं. अनुभवाच्या डागण्या मिळाल्याशिवाय विवाहित पत्नीचे हाल कुमारिकांना नाहींच कळायचे. लग्नासाठीं तळमळतात ! आणि हे बाप ! हे कसाब बाप आम्हांला असल्या खाटकांच्या हातीं देतात.

**बाबा**–हं–हं–हं–हें मी ऐकून घेणार नाहीं बरं. तुझी तूंच पसंती दिली होतीस.

**कुंदा**—होय–पण–मी एक झक् मारली म्हणून तुम्हीं शेण खायचं नव्हतं. तुम्हांला नव्हतं कळत ? तुम्हीं कां नाहीं मला सांगितलंत ? कां नाहीं माझे डोळे उघडून दिलेत ? तुम्हीं वडील होतां ना ? अनुभवी होतां ना ? मी अजाण होतें. मूर्ख होतें. लक्षाधीशाचं वैभव, शिक्षणाची झळाळी पाहून माझे डोळे दिपले !–पण तुम्हांला होती ना नजर ? कां नाहीं माझ्या डोळ्यांत अंजन घातलंत ?

**विजया**—हा तुमचा अपराध आहे बाबासाहेब. पसंतीचा भार तिच्यावर टाकून तुम्हीं आपली जबाबदारी हातावेगळी केली, ही तुमची लबाडीच ठरते.

**बाबा**—आम्हीच सर्वस्वी अपराधी आहोंत. आतां काय करणार आहांत मला शिक्षा ? एक पायपोस घेऊन मार ना माझ्या थोबाडावर !

**कुंदा**—तसंही केलं असतं-पण तुम्हांला पायपोस मारल्यानं कांहीं माझं दुःख नाहींसं व्हायचं नाहीं. माझे हाल मी भोगतें आहें, तेवढे पुरे आहेत ! ( विश्वनाथ येतो.) या–तुम्हीही या. माझी विटंबना पाहायला सारं जग इथं गोळा करा म्हणावं ! जशीं कांहीं आमंत्रणंच दिलीं होतीं एकेकांना !

**विश्व०**—काय ? काय झालं ?

**कुंदा**—काय झालं म्हणे ! काय करायचं आहे त्याच्याशीं तुम्हांला ! मी हंसेन, खेळेन, रडेन नाहींतर मरेन ! त्यासाठीं तुमचीं लग्नं कांहीं थांबायचीं नाहींत. तुमचंही लग्न होणार ! पहिल्या, पहिल्यानं ऐकलंस विजू , पहिल्यावहिल्या काळांत–अगदीं लग्न झाल्याबरोबर, हा विसू धंदाउद्योग सोडून तुझ्याभोंवती पारव्यासारखा पिंगा घालित राहील. हुरळलेल्या हृदयाच्या फुलत्या कळ्यांच्या पाकळ्या एकेका दिवसाबरोबर गळून पडून गेल्या, कीं पुनः हा आपल्या उद्योगाला लागेल–नवींनवीं कॉन्ट्रॅक्टं घेईल–शक्तीबाहेर कामं घेईल––पुरुष आहेत ना हे ?–शक्तीची घमेंड असते ना या लोकांना ? आणि मग शक्तीबाहेर कामं घेतलीं आहेत, म्हणून कुरकुरत तुला घरीं एकटीच रडत ठेवील ! शक्तीबाहेर कामं घेतलीं, त्यांत यश मिळालं पाहिजे, त्या यशाची वांटेकरीण तूंच आहेस, अशा गुळचट थापा देऊन तुझं तोंड बंद करील. आणि मग उघडया घरांत एकलकोंडी पडणारी तूं–पतिराजांच्या यशाची फुकटी वांटेकरीण होण्यासाठीं, भरल्या घराच्या मसनवटींत हडळीसारखी हिंडत राहाशील !

**विश्व०**—काय बोलते आहेस हें ?

**कुंदा**—हा माझा अनुभव ! बाहेरच्या देखाव्याला दिपून डोळे फुटले, मी आंधळी झालें, हें तेव्हां मला कळलं नाहीं. आतां कळलं म्हणून बोलून दाखवतें आहें. मी एक फसलेंच--झाली चूक आतां दुरुस्त करतां येत नाहीं–हिंदू बायकांचं अदृष्ट एकदां घडवलं, कीं मागनं बदलतां येत नाहीं. म्हणून म्हणतें, विजू , माझी चूक पाहून तरी सावध हो.

**विजया**—तूं काय म्हणतेस, तें अजून मला कळत नाहीं. अंधुक कल्पना येते आहे–पण मन कसं घोटाळ्यांत पडल्यासारखं झालं आहे.

**बाबा**—बरोबर आहे–बाई ग, अगदीं अक्षरशः बरोबर आहे. तुला अंधुक कल्पना येते–पण मला सूर्यप्रकाशासारखं ढळढळित दिसतं आहे.

**विश्व०**—बाबासाहेब, आपण काय बोलतां आहांत याचा विचार केलात का ? आपल्या उद्गारांचे परिणाम मला भोंवतील, हें आपल्या ध्यानांत आलं का ?

**कुंदा**—साऱ्या आयुष्यांत बाबा जर कांहीं बरोबर बोलले असतील, तर हेंच. या बोलण्याचा परिणाम व्हावा, म्हणूनच आज मी तिला मुद्दाम बोलावून आणलं—

**विश्व०**—मुद्दाम बोलावलं ? एवढयासाठींच मुद्दाम बोलावलं ? कुंदाबाई, तुम्ही इतक्या निर्दय असाल अशी माझी कल्पना नव्हती !

**कुंदा**—आणि तुम्हीं पुरुष इतके दांभिक असाल, याची मलाही लग्नापूर्वी कल्पना नव्हती. विजय, मन घोटाळ्यांत पडूं देऊं नकोस. हातचा बाण एकदां निघून गेला, कीं पुनः हातीं येणार नाहीं.

**विश्व०**—कुंदाबाई, एका माणसावरून साऱ्या मनुष्यजातीची कल्पना करणं अश्लाघ्य आहे. तुमचा अनुभव तसा आहे—मला कबूल आहे, पण विजयला तोच अनुभव येईल, असं म्हणायला तुमच्यापाशीं काय पुरावा आहे ?

**कुंदा**—पुरुषजातीची अरेरावी—नवरेपणाची जन्मजात जाणिव. तुम्हां पुरुषांनीं प्रेमाच्या फोल भाषेवर, धर्माच्या जुलमी नांवावर, आजवर आम्हां बायकांची दिशाभूल केली; पतिसेवा आणि पातिव्रत्य, यांच्या गोडव्यांच्या गाण्यांनीं आम्हांला झुलत ठेवलं; मायेच्या पुंगीवर डोलायला लावलं; पण ही स्त्रीजातीची नागीण आतां जागी झाली आहे, ती डंख मारल्याशिवाय राहाणार नाहीं, हें पक्कं ध्यानांत ठेवा. ( फोन वाजतो, कुंदा रिसीव्हर उचलून बोलते. ) हॅलो—हॅलो—खरंच का ? कीं मला नुसतं फसवायचं ?—इतक्या लवकर गेला ?—बरं—बरं ! ( वळून ) स्वारी येते आहे. विजू , तूं या खोलींत बैस—एकदां आमच्या प्रेमकथा ऐक—

**विजया**—हें काय बोलतेस सुमे ?

**कुंदा**—ऐक म्हणतें ना !—आणि अहो, तुम्हीं पुरुषलोक, तुम्हांलाही ऐकायचं असलं तर मुकाट्यानं ऐका. आतां कार येईल.

**बाबा**—ऐकून घे—बरं का, विश्वनाथ, ऐकून घे. मीही ऐकणार आहें. असली संधी पुनः मिळायची नाहीं. सगळ्याच बायका इतक्या उदार नसतात. आमच्या पिढींत आम्हीं तरुण होतों—पण नव्या पिढींतल्या जोडप्यांच्या प्रेमकथा ऐकाव्या, असं आम्हां म्हताऱ्यांना सुद्धां वाटतं. तूं तर तरुणच आहेस. धडा मिळेल तुला. बरं का. चल हो पुढं ! तुला आधीं थोडी प्रस्तावना सांगतों. ( त्याला लोटीत आंत नेतो. )

**विजया**--कुंदे, नवराबायकोचीं गुपितं ऐकणं मला तरी बरं वाटत नाहीं. हें पाप नाहीं का ?

( तिलंग--झपताल )

**कठिनता वरिन कशी । पापमय दिसत मज । कुटिल कामा ॥ धृ० ॥ कांत करि भाषिता । युवतिसह हितरता । नाहिं ते रुचिता ॥ १ ॥**

**कुंदा**--कांट्यानं कांटा काढतात, तसच पापानं पाप धुतलं पाहिजे. वेळच तशी आली आहे. जा आतां आंत. ( विजया जाते. क्षणभर कुंदा स्वस्थ बसते. बाहेर मोटर हॉर्न वाजतो. ती खिडकींतून पाहाते व आंत जाते. सर्वोत्तम व नंदू येतात. )

**सर्वोत्तम**—आज अगदीं तरवार मारली नंदू. मी आज मोठ्या खुषींत आहें. साऱ्या कापडबाजाराला कसा शह देतों पहा. नुसते चीत होतील सारे लोक. उद्यांपर्यंत वाट पाहा—मग काय तें तुला सांगतों—मग तुझं रिपोर्टरचं कसब दाखीव काय तें.

**कुंदा**--( प्र. क. ) येणं झालं वाटतं ? आणि हा कोण ? नंदू ? अगदींच बदललास कीं !

**नंदू**--यावेळीं मी रिपोर्टर या नात्यानं आलों आहें.

**कुंदा**--असं का ? तुझी ही नात्यांची यादी फारच मोठी दिसते !

**नंदू**—शेटसाहेबांनीं मला आज जेवायचं आमंत्रण दिलं आहे.

**कुंदा**—असं का ? ( सर्वोत्तमाला ) खरं का हें ?

**सर्वो०**--त्यांत खरंखोटं कसलं ? बसला बोलत, चल म्हटलं जेवायला.

**कुंदा**--पण इकडे जेवण तयार आहे कीं नाहीं, याची होती का कल्पना ?

**सर्वो०**--नसलं तयार तर होईल तयार ?

**कुंदा**—आपोआप ?

**सर्वो०**--आचारी कशाला ठेवला आहे?

**कुंदा**--वाटेल त्या माणसाला असा अवेळीं आणण्यासाठीं नव्हे. आज कुणी पाहुणा नको आहे यायला !

**नंदू**—बाईसाहेब, हें हिंदुत्वाचं लक्षण नव्हे. हिंदूच्या घरीं अतिथी म्हणजे दैवत आहे–

**कुंदा**—तूं रिपोर्टर म्हणून आला आहेस–धर्मप्रचारक म्हणून नव्हे. वाटेल तर या हकीकतीचा रिपोर्ट दे क्रॉनिकलला किंवा टाइम्सला.

**सर्वो०**—नंदू आज पंक्तीला आहे. ऐकलंस? नंदू आज जेवल्याशिवाय जाणार नाहीं.

**कुंदा**—नंदूनं आत्तांच्या आत्तां इथून गेलं पाहिजे.

**सर्वो०**—तो जाणार नाहीं !

**कुंदा**—तो गेलाच पाहिजे !

**नंदू**—अरे, पण माझ्या पोटाआड कां तुमचं हें भांडण ?

**कुंदा**—ऐक नंदू, दिवसांचे दिवस हे घरीं येत नाहींत. आज कुठं चुकून आले आहेत. आम्हाला घटकाभर स्वस्थपणें बोलायचं आहे, तिथं मोडक्या माच्यासारखा तूं रे कशाला ?

**नंदू**—हरहर ! मी मोडका माचा हं ! ठरलं–यापुढं नवराबायकोच्या घरांत प्राण गेला तरी जेवायला जायचं नाहीं. तीं अविवाहित विजया–किंवा विधुर बाबा-साहेबच बरे. धोतरभर निरस किंवा कोंकणभर सरस असं दुसरं कुणीच नाहीं त्यांना !

**कुंदा**—चालता हो पाहूं इथनं !

**नंदू**—जातों बाबा. नाहीं तर केरसुणी यायची. बहिण त्या जगदंबेचीच कीं नाहीं ! ( जातो )

**सर्वो०**—कुंदा, हा अतिरेक झाला.

**कुंदा**—कसला ?

**सर्वो०**—गृहिणीपणाचा. परक्यादेखत मला मान खालीं घालायला लावलीस !

**कुंदा**—कसला परका हा ! कुटाळ उनाडांचा किडा हा ! त्याची कसली पर्वा ? पण दुसरा कुणीही असता, तरी मी हेंच केलं असतं.

**सर्वो०**—तेंही खरंच. अपमानच करायचं ठरलं–तिथं माणुस सुमाणसाची काय खिजगणती ? काय मिळालं यामुळं ?

**कुंदा**--मनाचं समाधान. घरची गृहिणी या नात्यानं मलाही कांहीं जाणीव आहे, याची इकडेही कल्पना आली थोडीशी. कांहीं वाटतं का मनाला ?

**सर्वो०**--कां ?

**कुंदा**--कां ? घरीं आपली बायको म्हणून कुणी तरी एक आहे, याची आठवण तरी आहे का इकडे ?

**सर्वो०**--कुंदे, हें तूं विचारावंस का ?-तुझ्या सुखासाठींच ना मी असा मर-मर मरतों आहें ?

**कुंदा**--माझ्या सुखासाठीं ?

**सर्वो०**--तर मग कुणाच्या ?

**कुंदा**--कुणाच्या सुखासाठीं एवढा जिवाचा आटापेटा चालला आहे, तेंच मला माहित नाहीं. मला यांत काडीभरसुद्धां सुख नाहीं. लग्न झालेली वधू मी—एक क्षण-भर तरी मला तुमचा सुखाचा सहवास मिळतो आहे का ? पतीचा सहवास दुर्मिळ झाला तर वैभव घेऊन काय जाळायचं आहे ? आज दीड वर्ष हेंच ऐकतें आहें. पूर्वी पांच लाख होते, तेव्हां दहांचा हव्यास होता. आतां विसांचे पन्नास लाख व्हायची धडपड चालली आहे. दरखेपेला तेंच उत्तर. पांचाचे दहा होऊंदेत-दहा झाले. पुनः तेंच-दहाचे वीस केव्हां ?-पुनः तेंच. आतां पन्नास झाले, कीं कोट्याधीश व्हायचा ध्यास लागेल ! आणि मी मात्र इकडे एकटीच सडत पडेन. कुणासाठीं हा हव्यास ? माझ्यासाठीं तर खास नव्हे. ( ती बोलत असतां मधूनमधून फोन येत आहे व सर्वोत्तम उत्तरें देत आहे. ) ऐकूं आलं का ?

**सर्वो०**--काय म्हणत होतीस ?

**कुंदा**--माझं कर्म ! कांहींच ऐकलं नाहीं ?

**सर्वो०**--नाहीं. त्या जपान्यांची आणि अहमदाबादवाल्यांची टक्कर लागली आहे ना ?

**कुंदा**--हें माझं सौख्य ! या माझ्या सौख्यासाठींच वाटतं, हे जपानी अमदाबादवाल्यांशीं झुंज खेळताहेत ? निराधार वेलीसारखी मी इकडे सुकून जातें आहें, याची आहे का चाड ? काय करायचं आहे मला तुमचं फुसकं वैभव घेऊन ?

**सर्वो०**--असं कसं म्हणतेस ? या कापडबाजाराच्या चढाओढींत मी साऱ्या

व्यापाऱ्यांना पाणी पाजलं, तर माझ्या त्या यशाची तूंच नाहीं का भागिदारीण होणार ?

**कुंदा**--यशाच्या फुकव्या वांव्यानं प्रेमाची भूक भागत नाहीं, हें इकडे केव्हां कळणार ?

**सर्वो०**—असं पहा, एवढं हें जपान्यांचं पिवळं संकट पचवतों-मग जर--

**कुंदा**--किती वेळां सांगितलंत हें ?

**सर्वो०**--तेंही खरंच !

**कुंदा**--मग कशाला माझ्याशीं लग्न केलंत ? काय अडलं होतं तुमचं बायकोवांचून ? एवढ्याही उपर लग्न केलं, तर बायकोला तरी बरोबर बाळगावी ?.

**सर्वो०**--कुठं ? कापडबाजारांत कीं कॉटन ग्रीनवर ? ( हंसतो )

**कुंदा**--तुम्हांला हंसूं येतं आहे पण माझा जीव आंतल्या आंत रडतो आहे. त्याला शांत कोण करणार ? ( फोन वाजतो )

**सर्वो०**--हॅलो-हॅलो-यस्-यस्, यस्-यस्-हुं पोतेज आवूं छूं! ( निघण्यासाठीं कोट टोपी घेऊं लागतो. )

**कुंदा**--कुठं चाललांत ?

**सर्वो०**--मार्केटांत. ( वरदा येते. )

**कुंदा**—आणि आतां नंदू जेवायला असता तर ?

**सर्वो०**--तरीही गेलों असतों.

**वरदा**--तरीही गेलेच असते-काय वेडा प्रश्न हा ?

**सर्वो०**--कोण वरदा ? तूं इकडे कुणीकडे ?

**वरदा**—बाबांना शोधतें आहें ! बाप काय, नवरा काय-दोघेही सारखेच. नेहमीं घराबाहेर ! आम्हीं जशा कांहीं कैदीच !

**कुंदा**—ऐका.

**सर्वो०**—बहीण तुझीच कीं नाहीं ?

**वरदा**—भेटले का आमचे बाबा कुठं ?

**सर्वो०**—भेटले तर देईन पाठवून-( जाऊं लागतो. )

**वरदा**—काहीं नको पाठवायला ! भूक लागली कीं येतील घरीं. ( सर्वोत्तम जातो-तिघे आंतून येतात. )

**बाबा**—यापूर्वींच आलों असतों बरं पोरी ! पण या नाटकाचा कॉम्प्लिमेंटरी पास मिळाला होता. आंतून पाहात होतों.

**वरदा**—( विजयेला ) आणि तुलाही मिळाला होता का पास ?

**विजया**—हो. मलाही-आणि विसूलाही ! ऐकलंस विसू, हें खरंखुरं नाटक मोठं परिणामकारक ठरलं. तुला नाहीं असं वाटत ?

**विश्व०**--तुझं हें भाषण ऐकलं, कीं माझं हृदय धडधडूं लागतं !

**वरदा**--आणि हे म्हणे पुरूष !

**विजया**--सुमे, केवढे उपकार केलेस माझ्यावर ! किती चुकत होतें मी ! ऐक विसू, आज मी माणसांत आलें. आज मला अक्कल आली-नवी नजर आली ! ऐक, सर्वोत्तमरावांनी सांडलेल्या सुमीच्या न दिसणाऱ्या रक्ताच्या तांबड्या शाईनं, आज आपला वाङ्निश्चय खोडून टाकला. या पुढं नवा डाव-नवा पाव !

**बाबा**--शाबास पोरी !

**वरदा**--हिप हिप हुर्रे ! ( त्रिवार )

( **पडदा.** )

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

( अपोलो स्ट्रीटवर नंदू पद म्हणत आहे. इतक्यांत सदोबा येतो )

**सदोबा**--वाः नंदू, एवढ्या भरल्या रस्त्यावर गाणं गात राहिला आहेस-कांहीं वाटतं का तुला ? फकीर म्हणून भिक्षा घालायचा कुणी तरी !

**नंदू**--तेवढेच सही ! चहाची तरी सोय होईल ! पण हे इथले सट्टेबाज लोक एक दमडीसुद्धां नाहीं काढायचे खिशांतून ! कवडीचुंबक आहेत सारे !

**सदोबा**--मग गातो आहेस कशाला ? तुझा पोषाख काहीं कवीचा दिसत नाहीं आणि इथं कसलं संमेलनही भरलेलं नाहीं !

**नंदू**--कवीला कसलंच बंधन नाहीं. पण आज सट्टेबाज याच नात्यानं आलों आहें. गात गात हिंडत राहिलों तर मला वेडा समजतील-तेवढ्याचाच फायदा घेईन. वेडा समजून कुणी लक्ष देणार नाहींत माझ्याकडे ! बोलत राहातील. तेवढंच एकादं टिप मिळालं तर त्याचा फायदा घेईन.

**सदोबा**--तें खरं-पण हा फायदा घ्यायला खिशांत आहेत का चार चव्वल ?

**नंदू**--परवां तुझ्या शेटकडूनच उकळले ना शंभर रुपये !

**सदोबा**--शंभर रुपये ? आमच्या शेटकडून ? मोठं आश्चर्य आहे. लेकाचा एक दमडी अधिक द्यायचा नाहीं मला कारकुनाला-आतां तुझ्यावरच कसा एवढा प्रसन्न झाला ? कसं भोंक पाडलंस हें त्याच्या खिशाला ?

**नंदू**--ब्लॅकमेल-बाबा-ब्लॅकमेल! परवां रिपोर्टर या नात्यानं त्यांच्या घरीं गेलों होतों. चार नाजूक बातम्या मिळाल्या ! गृहछिद्रं चव्हाट्यावर आणायची तंबी देतांच एकदम खिशांत हात घातला कीं बेट्यानं !

**सदोबा**--तेव्हां हे शेअरबाजारांतले पैसे शेअरबाजारांतच गमावणार आहेस वाटतं ?

**नंदू**--आतां कमावणार कीं गमावणार तेंच पाहायचं आहे. जमली तर दिवाळी-नाहीतर शिमगा आहेच रोजचा ! या बाबतींत आम्ही लोक अगदीं या सटोडियांसारखेच. पैसे केव्हां नसतातच खिशांत-म्हणून जेव्हां कधीं येतात, तेव्हां त्यांना जायचीच घाई फार होते.

**सदोबा**--मग मलाच देऊन टाक ना ! सत्पात्रीं दान होईल ! कुठं तरी गमावायचे-

**नंदू**--कुठं तरी नाहीं-अजाण मुला-कुठं तरी नाहींत ! हे पैसे कुठं जायचेच असले तर खऱ्याखुऱ्या कपाशीच्या गठ्ठ्यांतच गेले पाहिजेत. बाकी तूंही एक लहानसा कपाशीचा थैलाच आहेस म्हणायचा ! ( विश्वनाथ येतो ) या गंवडी महाराज, या कपाशीच्या बालेकिल्ल्यावर आपणही मोर्चे लावूं लागलांत का विश्वनाथपंत ?

**विश्व०**--नाहीं रे बुवा ! आमच्या कडक दगड-विटा आहेत त्या ठीक आहेत. या कपाशीच्या मऊमऊ व्यवहारांत माझ्यासारख्या गंवड्याचा चुना होऊन जायचा. मी शोधतों आहें त्या वरदेला !--

**नंदू**--वरदेला ?

**सदोबा**--वरदेला ? आणि या इथं ? अपोलो स्ट्रीटवर ? बॅकबे, हँगिंग गार्डन अगदीं ओस पडल्या वाटतं ?

**विश्व०**--मीही तेंच म्हणत होतों-पण कोण सांगेल तिला ? शिवाय तिचे ते वडील-तेही एक अवलियाच आहेत ! सट्टेबाजारांत जाणार म्हणून ती पोर म्हणते काय, आणि हे तिला पाठवतात काय !

**सदोबा**--गंमत आहे झालं ! उद्यां जाईल कुणाचा तरी हात धरून-

**विश्व०**--हं-चूप ! हें मात्र मी ऐकून घेणार नाहीं. निर्भिडपणा म्हणजे कांहीं मूर्खपणा नव्हे. तुमच्या आमच्या सारख्या पन्नास माणसांपेक्षां ती जास्त हुषार आहे. कुणाला भीतीच असली, तर तिचा हात धरायचा विचार करणाराला ! तिला खास नव्हे !

**नंदू**--खरं आहे. असल्या पोरी पाहिल्या, कीं कायद्यानं काव्यं बंद करावीं असं वाटूं लागतं. कुठं ती कालिदासादी कवींची मुग्धा-तनुलतिका-नवयौवना-गृहदेवता आणि कुठं ही या वरदेसारखी नगरभवानी मुसळदेवता ! हा सारा या शिक्षणाचा परिणाम ! जगांतून सारं काव्य नाहींसं होत चाललं आहे एकेक दिवस !

**सदोबा**—पुनः विसरलास तूं यावेळीं कवी नाहींस.

**नंदू**--इतर कांहीं धंदे केले तरी मी मूळचा कवी. तरुणीचा उल्लेख आला, कीं काव्य उसळून बाहेर येतं. ( जयवंत येतो. ) आणि हे एक रसिक, त्या उधळल्या काव्यावर नजर ठेवून बसले आहेत ना ?

**जयवंत**--कुठलं उधळतं काव्य ?

**सदोबा**--ती जगदंबा ! प्रणयपत्रिका पाठवली होतीस ना तिला ?

**जय०**--कोण ? वरदा का ? अरे, ती नुसती गंमत केली होती. सर्वोत्तमदादा सारखे मागं लागले-म्हटलं पहावी एकदां चूष करून; पण—

**विश्व०**--काय झालं ?

**जय०**--अजून जिवंत आहें, एवढंच. आतांच पाहिली तिला. दलाल स्ट्रीटच्या नाक्यावर एका लट्ठ पोटाच्या बुड्ढ्या भाटियाशीं बोलत होती. तसाच आडवळण घेऊन पळालों—( वरदा येते. ) अरे बापरे !

**वरदा**--आडवळण घेऊन पळालांत का ? पत्र पाठवतांना वाटलं होतं का कांहीं ? बरं का विश्वनाथपंत, हा लग्न करणार आहे ह्मणे माझ्याशीं—

**विश्व०**--वेडा आहे झालं !

**नंदू**--वेडा कसला ?—जंगली आहे ! किती झालं तरी घिसाडीच. मोटार मेकॅनिक म्हटलं, कीं मोठेपणा येतो. इंग्रजी शब्द आहे ना तो ? माझ्यासारखा एखादा साहित्याचार्य असता तर तिनं कदाचित विचार केला असता.

**वरदा**—साहित्याचार्य म्हणे ! जेवणाचं साहित्य नाहीं घरांत-नि आचाऱ्याचं कामही नाहीं ओळखीचं ! कांहीं धंदाउद्योग नसला, घरीं उंदीर उपाशीं मरत असले, कीं तो झाला साहित्याचार्य ! त्यापेक्षां हे गवंडी घिसाडीच बरे.

**नंदू**—जयवंत, आशेला जागा दिसते तुला !

**वरदा**—कसल्या आशेला ? बायका समोर दिसतांच लाजून मुरका मारणारीं हीं हल्लींची पोरं पाहिलीं, कीं मला आजन्म कुंवार राहावंसच वाटूं लागतं !

**विश्व०**—खरंच; किती तरी गरीबांचा बचाव होईल त्यामुळें. हें पहा वरदा, लग्न करणार नाहीं म्हणून तूं एकदांची प्रतिज्ञा करून टाक, कीं जयवंतासारख्या आशाळभूतांचा जीव एकदांचा खालीं पडेल.

**नंदू**–हें पहा वरदे, मीही हल्लीं बिझनेसमध्यें शिरलों आहे कपाशीच्या गठ्ठ्यांशीं हल्लीं झगडायला लागलों आहें. असं पाहूं नकोस माझ्याकडे–उद्यां लक्षाधीश झालों, कीं पायावर लोळण घेशील.

**वरदा**–शेअर बाजारांत उंदीर घुशी देखील वावरत असतात! बिझनेस करणाराचं तोंड तर पहा. चार दमड्या तरी आहेत का खिशांत?

**नंदू**––दमड्या? (नोटा दाखवून) या पहा–झाली खात्री? हं हं!! उगीच नाहीं बिझनेस करीत! आतां काव्यबिव्य सारं सोडून दिलं आहे. आतां माझा एकच ध्यास–पैसा–पैसा–पैसा!–( जातो. )

**वरदा**––मला वाटतं एक दिवस हा तुरुंगांत जाणार. कुणाच्या तरी खिशांत हात घातलासा दिसतो यानं.

**सदोबा**––तोही एक धंदाच आहे. पण साधला पाहिजे––

**जय०**––मला माहित आहे. या मूर्खानं–( जीभ चावतो. )

**वरदा**––कां अडलीशी जीभ? विसुभाऊ, हे तुमचे मर्द बरं. असल्या मर्दांच्या जिवावर आम्हीं बायकांनीं जगायचं!

**विश्व०**––काय माहित आहे तुला? सांग ना! ( जयवंत मागेंपुढें करतो. ) खरं आहे वरदा, मर्दांची व्याख्या आतां बदलली पाहिजे.

**सदोबा**––असं पहा वरदाबाई, याला मूर्ख म्हणा हवा तर. पण तो मात्र पक्का बदमाष आहे बेटा. रिपोर्टरच्या नांवाखालीं आमच्या शेटनां नाडतो आहे. त्यांचं घरचं भांडण चव्हाट्यावर आणायची तंबी देऊन त्यांच्याकडून हे पैसे उकळतो आहे.

**वरदा**––असं का? पाहिलंस विसुभाऊ, हे दुसरे मर्द. हे आमच्या शेअर-बाजारचे अध्वर्यू! हीं असलीं माणसं पाहिलीं, कीं आतां हें व्यापाराचं जोखीम आम्हीं बायकांनींच सावरलं पाहिजे, असं वाटूं लागतं.

**विश्व०**––शेअरबाजारांत आतां जाऊं लागलीस वाटतं?

**वरदा**––आतां समजेल आपोआप. आतां भाकऱ्या बडवायला शिका तुम्हीं पुरुषलोक. फार घमेंड चढली आहे त्या सुमीच्या नवऱ्याला!–

**सदोबा**––म्हणजे? आमच्या शेटना देणार का तूं शह?

**जय०**--तें खरं आहे. झगडावं तर पेहेलवानाशीं. तें असं आहे-( थांबतो )

**वरदा**--हं-बोला ना! थांबलांत कां? जिभेचा क्लच अडला वाटतं? कीं टॉप स्पीडमध्यें गिअर जात नाहीं?

**जय०**--जरा भीती वाटते बोलायला-

**विश्व०**--भीती वाटते? कुणाची? ( जयवंत डोळ्यांनीं खूण करतो ) हिची? वरदेची? लव्ह लेटर पाठवलं होतंस ना हिला?

**जय०**--म्हणूनच--

**सदोबा**--वारे मर्द!

**वरदा**--आणि तूं?

**सदोबा**--आपल्याला नकोत त्या लग्नाच्या भानगडी. आपलं दुकान भलं कीं आपण भले! आपला एकटा जीव सदाशिव आहे तोच बरा. लग्न करायचं आणि घरीं बायकोला एकटी टाकून दुकानांत पडायचं? बायकांच्या जातीवर आपला येवढा विश्वास नाहीं!

**वरदा**--हट् भेकडा! बायकांच्या जातीवर तुझा विश्वास नाहीं तर बायकांच्या जातीनं तरी तुझ्यावर विश्वास कां टाकावा? पाहिलंत विसुभाऊ, मर्दांचा हा दुसरा नमुना पहा.

**विश्व०**--आणि तिसऱ्या नमुन्यासाठीं माझ्याकडे बोट दाखवणार आहेस वाटतं?

**वरदा**--तसंही केलं असतं-पण तो अधिकार माझा नव्हे आमच्या घरीं जा, तिथं बसली आहे एक माझी वाट पाहात, तिला आहे तो अधिकार.

**विश्व०**--तुझ्या घरीं आहे? विजया तुझ्या घरीं आहे? हें आधीं कां नाहीं सांगितलंस मला?

**वरदा**--विचारलं होतं का मला? जा-धांवा-माळ घेऊन बसली असेल तिथं!

**विश्व०**--आज आठ दिवस झाले-कांहीं केलं तरी ती माझी भेट घेत नाहीं. त्या दिवशींचं भाषण म्हणजे मला थट्टा वाटली होती—

**वरदा**--बायकांच्या शब्दाची ही किंमत! आमचा प्राण गेला तरी तुम्हाला ती थट्टाच वाटायची!

**विश्व०**--खरं आहे. ती चूकच आहे माझी. माफ कर वरदे-( जातो )

**वरदा**—मर्दांचा हा तिसरा नमुना. कसा फसला !

**सदोबा**--म्हणजे ?-हें खोटंच सांगितलंस कीं काय ?

**वरदा**--अर्थात्-तीं पहा विजया येते आहे. तेवढ्यासाठींच मी घालवून दिला त्याला ! आणि अहो पत्रलेखक, तुम्हींही धडा घ्या--

**सदोबा**--मी आपला जातों. आपल्याला नको कुणी धडा द्यायला. ( जातो )

**जय०**-वरदे--

**वरदा**--हं-बोला-( तो अडखळतो ) हं-बोला-बोला-बोला. देवानं चांगली जीभ दिली असतां, पत्रं कशाला खरडतां ? ( विजया येते ) हा पाहिलास एक मर्द विजू-मला पाहातांच याची दांतखिळी बसते आणि अर्ज टाकतो आहे लग्नाचा.

**जय**--पण नको-पण नको. असल्या गोष्टीला एकांतच पाहिजे-हा रस्ता-अपॉलो स्ट्रीट-ही बँक-हा शेअरबझार-नाहीं-लोक पाहातात-नाहीं-आतां घरींच भेटेन-( जातो )

**विजया**--विसू गेला ना ?--काय पाहाते आहेस ?--गेला तो--

**वरदा**—अगदींच भोळा आहे बिचारा ! सर्वोत्तम भाऊजींनीं त्याला बनवलं आहे. पण अशी थप्पड मिळेल म्हणावं !

**विजया**--वरू, पुनः पुनः मन कच खातं. वाटतं-कशाला या उठाठेवी ? विसू कांहीं तसा नाहीं—

**वरदा**—लग्नापूर्वी सर्वोत्तमरावही असेच होते. लग्न झालं, कीं हे साप कात टाकूं लागतात.

**विजया**--हृदयाशीं झगडावं लागतं आहे बरं वरू. दोघांनाही एकाच डावानं वठणीला आणायचं म्हणून आपण सरसावलों आहोंत खऱ्या-पण मन कसं कासावीस होतं—

**वरदा**--आरंभींच असं घाबरून चालायचं नाहीं. आपल्याला कांहीं कुणाचा गळा कापायचा नाहीं. कुणी गळा कापूं म्हणेल तर त्याच्या हातची सुरी तेवढी हिसकावून घ्यायची !

**विजया**—वरू, मन किती कठिण करावं लागतं आहे म्हणून सांगूं ? लहानपणापासून आम्हीं एकत्र वाढलों. हा नवरा-ही नवरी-असं प्रत्येकानं म्हणावं ! कुणी

असं म्हटलं, तर एवढीशीं होतें तरी मी लाजत होतें. वय वाढूं लागलं, समज येऊं लागला, तसतशी माया वाढत गेली. परिचयानं प्रेम उत्पन्न झालं. प्रेमाच्या गोड कल्पनेनं आजूबाजूचं दिसेनासं झालं. वरू, तें अज्ञान किती मोहक होतं !—

**वरदा**—मोहक असलं तरी तें अज्ञान होतं. सौंदर्य असलं तरी ते आंधळ्याचं होतं. दुसरा दिसत नाहीं नि स्वतःला पाहातां येत नाहीं.

**विजया**—असं तर खरंच. पण त्या अज्ञानांत आनंद होता. सुमेचा संसार पाहिला त्यामुळं डोळे उघडले, ज्ञान झालं, पण त्याचा हृदयाला धक्का बसला !— अज्ञानांतला आनंद चूरमार होऊन गेला !

( **नट-केदार**—त्रिताल )

**नाहिं राहिली कांहीं ममता । ही नव माया पाहिलि आतां ॥ धृ० ॥ जाळित हृदया ज्ञान जगाचें । भीषण वाटे साधन-समता ॥ १ ॥**

**वरदा**—आतां माझं ऐक. अशी तोंड चुकवून राहूं नकोस. तुझ्यासाठीं मी विसुभाऊला फसवून घरीं पाठवलं खरं पण मागाहून माझं मन मलाच खाऊं लागलं. इथल्या आपल्या कामाला आतां तोंड लागलें आहे. आतां घरीं चल, विसुभाऊला भेट, त्याच्या मनाची परीक्षा घे आणि नंतर कसं वागायचं तें तुझं तूंच ठरव.

**विजया**—प्रसंगानं मन हें असं दुबळं होतं. रोज तुला उपदेश करणारी मी, आज उपदेशासाठीं तुझ्या तोंडाकडे पाहात राहातें आहें.

**वरदा**—पण विसुभाऊचं तोंड किती गोरंमोरं झालं आहे, तें आधीं पाहूं चल.

( जातात. )

---

## प्रवेश दुसरा

( बाबासाहेबांचा दिवाणखाना )

( कुंदा बसली आहे व बाबासाहेब कपडे करून जायला निघाले आहेत )

**बाबा०**—ऐकलंस सुमे, मला आतां गेलंच पाहिजे. पण तो आला, लघळपणा करूं लागला, किंवा थुलथापा देऊं लागला, तर मुळींच नमतं घेऊं नकोस. आधीं

चांगली खोड मोडली पाहिजे गुलामाची! चांगली अद्दल घडल्याशिवाय समेट झालं तर तें फार दिवस टिकत नाहीं. काय समजलीस? जाऊं मी? ( जातो. कुंदा इकडे तिकडे पाहात फिरते. अस्वस्थपणें कोचावर बसते. जांभई देते. पुनः उठून खिडकींतून पाहाते आणि दचकून दाराजवळ जाते–तोंच विश्वनाथ येतो. )

**कुंदा**—कोण पाहिजे तुम्हाला?

**विश्व०**—कुंदाबाई–नव्हे सुमे, असं काय बोलतेस परक्यासारखं? मी काय अपराध केला आहे? सर्वांनींच माझ्याशीं असा अबोला कां धरला आहे? बाबा-साहेबांनींसुद्धां माझ्याबरोबर बोलूं नये, असं झालं आहे तरी काय? दारांतच भेटले पण एक शब्दसुद्धां बोलले नाहींत! बोल ना सुमे, विजया कुठं आहे?

**कुंदा**—असती तर इथं दिसली नसती का?

**विश्व०**—मग वरदेनं मला कां तस सांगितलं?

**कुंदा**—काय सांगितलं?

**विश्व०**—तिनं सांगितलं, कीं विजया इथंच आली आहे म्हणून.

**कुंदा**—इथं कशाला येईल ती? हें कांहीं तिचं सासर नव्हे–कीं माहेरही नव्हे!

**विश्व०**—माफ कर, सुमे, माफ कर. कां असा माझा छळ करतेस? कुठं आहे विजया?

**कुंदा**—आपल्या घरीं.

**विश्व०**—नाहीं–तीं आपल्या घरीं नाहीं. मी मघाशींच पाहून आलों.

**कुंदा**—त्यावेळीं नसली तर आतां आली असेल. फोनसुद्धां नाहीं इथं, नाहीं तर तपास केला असता.

**विश्व०**—काय करूं?–माझा अपराध काय, एवढं तरी कुणी मला सांगेल–

**कुंदा**—तुझा अपराध एकच. तूं जातीनं पुरूष आहेस, भावी नवरा आहेस, नंदू म्हणतो तसा टायरंट आहेस.

**विश्व०**—एकाच्या चुकीसाठीं सरसहा साऱ्याच पुरुषांना तुम्हीं दोषी ठरवणार! सुमे, हा अन्याय नाहीं का?

**कुंदा**—मनुस्मृतींतून बायकांची बदनामी घुसडणाऱ्या तुम्हां लोकांना अशी एकजात शिक्षा दिल्याशिवाय तुम्हीं वठणीला कसे येणार? एकादी स्त्री

वाईट निघाली असेल; पण तेवढ्यासाठीं खोटेपणा, साहस, मूर्खपणा, अति-लोभीपणा, घाणेरडेपणा, निर्दयपणा, असे दोष सरसहा साऱ्याच स्त्रीजातीला लावले गेले, त्यावेळीं ही अक्कल कुठं गेली होती ?

**विश्व०**--कुणा मूर्खांनीं केव्हां स्मृती लिहून ठेवल्या, त्याची शिक्षा मला कां ?

**कुंदा**--कुणी मूर्खानं केव्हां स्मृती लिहून ठेवल्या, त्याची शिक्षा निष्कारण आम्हांला मिळते आहे, म्हणून ! तुम्ही आम्हांला निर्दय ठरवलं आहे–घ्या आतां त्याचा प्रत्यय !

**विश्व०**--अशानं त्या स्मृतीच नाहीं का खऱ्या ठरणार ?

**कुंदा**--ठरूंदेत. त्यांतच आमचा जय आहे. ( बाहेर घंटा वाजते ) कोण आलं ? जा पाहूं आंतल्या खोलींत. स्वारीच दिसते ही ! ती संवय आहे ना ऑफिससारखी ?

**विश्व०**--सुमे, विजया कुठं आहे ?

**कुंदा**--इथं कांहीं माझ्या मुठींत नाहीं ! आधीं जा पाहूं आंत. ( विश्वनाथ जातो आणि सर्वोत्तम येतो–कुंदा आंत जाऊं लागते. )

**सर्वो०**--थांब–

**कुंदा**--कां ?

**सर्वो०**--मी सांगतों म्हणून.

**कुंदा**--कोण तुह्मी ?

**सर्वो०**--असं का ? इतका दिमाख चढला आहे का ? हंसतेस काय ? मी तुझा पती आहें, याची आठवण आहे का तुला ?

**कुंदा**--चांगली आठवण आहे नि म्हणूनच मी इथं आलें आहें.

**सर्वो०**--मग आतां चलावं परत घरीं. मी न्यायला आलों आहें. पुरे झालं आतां माहेरपण–

**कुंदा**--मला नाहीं अजून माहेरपण पुरे झालं !

**सर्वो०**--पण मी सांगतों आहें–माझा हुकूम आहे !–

**कुंदा**--हुकूम म्हणे ! बायको म्हणजे गुलाम नि नवरा म्हणजे मालक का ? कशाला यायचं घरीं ? घरचा घरधनीच जर कधीं घरीं नसतो, तर तिथं येऊन तरी काय करणार ?

**सर्वो०**--मी घरीं येईन किंवा नाहीं येणार-त्याच्याशीं तुला कर्तव्य नाहीं. माझा मी मुखत्यार आहें.

**कुंदा**--मग माझीही मी मुखत्यार आहें. मीही घरीं येईन किंवा नाहीं येणार! त्या घरांत जेवढा अधिकार तुम्हांला आहे, तेवढाच मलाही आहे.

**सर्वो०**--नाहीं. मी घरचा मालक आहें आणि तूं नुसती माझी बायको आहेस.

**कुंदा**--' नुसती बायको ' म्हणजे काय ? बायकोला घरांत मालकी नाहीं ?

**सर्वो०**--मालकी आहे-पण ती नवऱ्याच्या हुकमतीखालीं ! स्वतः बायकोला स्वातंत्र्य नाहीं-स्त्रीधनाखेरीज स्वतःची इस्टेट नाहीं-स्वतःचं स्वामित्व नाहीं-सधवा असो किंवा विधवा असो-ती नुसती अन्नवस्त्राची मालकीण !

**कुंदा**--तुमचं अन्नवस्त्र मला नको आहे !

**सर्वो०**--नको म्हटलं तरी टाकतां येत नाहीं तें ! कुंदे, कायदा काय आहे तुला माहित आहे ? तूं नाहीं म्हटलंस, तरीही तुला घरीं परत यायला भाग पाडणं कायद्याच्या हातीं आहे, हें तुला माहित आहे ?

**कुंदा**--पूर्वी माहित नव्हतं-पण आतां झालं माहित !

**सर्वो०**--झालं ना माहित ? मग चल आतां घरीं.

**कुंदा**--कायदा तुमच्या हातीं आहे ना ? ध्या तर मग कायद्याचा उपयोग करून ! जोंपर्यंत तुम्हीं रोज ठराविक वेळीं घरी यायचं कबूल करणार नाहीं, तोंपर्यंत मी येणार नाहीं.

**सर्वो०**--धंदाउद्योग सोडून !

**कुंदा**--धंदाउद्योगालाही मर्यादा आहे. तुमच्या येण्याजाण्याला काहींच ताळतंत नाहीं.

**सर्वो०**--हें व्यापाऱ्याचं जिणं-कुंदे, आतां किती परीनं सांगूं तुला ?-मला घरीं यायला नको का आहे ? घराचा मला द्वेष आहे असा का तुझा समज आहे ? बाजारांत डांबून बसणं मला आवडतं का आहे ? जोपर्यंत मी व्यापारांत आहें, तोंपर्यंत माझा नाइलाज आहे. एका क्षणाच्या चुकामुकीनं साऱ्या व्यापाराची होळी होईल, याची तुला कल्पना तरी आहे का ?

**कुंदा**—चांगली कल्पना आहे. पण मी काय करूं ? मलाही कांहींतरी उद्योग लावून द्या.

( तिलक कामोद—अर्धी धुमाळी )

**राहिल कां घरीं भाविक नारी । होइ विषमा यामिनी सारी ॥ धृ० ॥ आला धांवत परता गेला । साहिल कां घरद्वारीं ॥ झालि निराशा प्रेमा-पुरती । संगति कारागारीं ॥ १ ॥**

घरीं माशा मारित बसणं मला आवडत नाहीं. वाचून वाचून वाचायचं तरी किती ! त्याचादेखील नाहीं का कंटाळा यायचा ? एकटं असलं, कीं घर कसं खायला येतं ! मलाही न्या आपल्या मार्केटांत !

**सर्वो०**—पुनः आलीस मूळपदावर. बायकोला मार्केटांत घेऊन गेलों तर लोक मला गाढव नाहीं का म्हणणार ?

**कुंदा**—आणि न नेलीत तर बायको काय म्हणेल याचा विचार केला आहे का ! तुम्हीं तिकडे गुंतून पडलां तर मीं घरीं काय करूं ? सांगा ना, मी काय करूं ?

**सर्वो०**—आहे ही परिस्थिती अशी आहे. यांत काय बदल करावा हें मला तरी सुचत नाहीं. तूं उपाय सुचवलास तर त्याचा मी विचार करीन.

**कुंदा**—मला सुचला तो उपाय सुचवला; पण तो थट्टेवारी नेऊन उडवून द्यायचा.

**सर्वो०**—तो उपाय का ? कांहींतरी बोलायचं म्हणून बोलतेस झालं !

**कुंदा**—एकदां करून तर पहा ना तो उपाय !

**सर्वो०**—असं कधीं झालं आहे ? आपलं कागदाचं पुडकं न्यायचं तशी का बायको फिरवायची बरोबर ?

**कुंदा**—तर मग मला कांहीं काम द्या.

**सर्वो०**—आतां या तुझ्या आततायीपणाला काय म्हणावं, हेंच मला कळत नाहीं. इतर कुणा व्यापाऱ्यांच्या बायका नाहींत का ? त्यांनाही असंच घरांत एकटं राहावं लागतं ना ? मग त्या कुठं तक्रार करीत नाहींत त्या ?

**कुंदा**—कशावरून म्हणतां ? मी तक्रार करतें, असें तुम्हीं बाकीच्या व्यापाऱ्यांना कधीं सांगितलं आहे ?—बोला ना ! नाहीं ना ?—मग त्यांच्या तक्रारी

तुम्हांला कशा कळणार ? याहीउपर असं समजा—आळसांत दिवस घालवणं त्यांना आवडत असेल !—मला तें आवडत नाहीं—तरीही तुह्मी मला सक्तीनं घरांत डांबून ठेवणार का ?

**सर्वो०**—दुसरा काय उपाय आहे ?

**कुंदा**—नाहीं ना ? तुह्मांला उपाय सुचत नाहीं—माझा उपाय तुह्मांला पटत नाहीं. राहतां राहिला माहेरवास—म्हणूनच तो पत्करला. बाप आहे, बहिण आहे—त्यांना माझ्या सुखदुःखाची चाड तरी आहे—

**सर्वो०**—पुरे—पुरे—एवढा वेळ ऐकून घेतलं तें पुरे झालं. बऱ्या बोलानं घरीं येणार कीं नाहीं, ते एकदां सांग.

**कुंदा**—नाहीं—नाहीं—नाहीं, त्रिवार नाहीं. तुम्हीं मला कांहीं तरी उद्योग लावून दिल्याशिवाय—पोटापुरतं मी कांहीं तरी मिळवीन एवढं काम मला दिल्याशिवाय प्राण गेला तरी मी तुमच्या घरीं येणार नाहीं. तुमचं मेलेलं अन्न खात नुसती तुमची जेवणावारी—

**सर्वो०**—हं—हं—फार झालं ! असली भाषा मी केव्हांही ऐकून घेणार नाहीं. पोटापुरतं काम दिलं पाहिजे ह्मणे !—लोक श्रीमंतीसाठीं जिव टाकतात आणि तुला मात्र हे भिकेचे डोहाळे !

**कुंदा**—मग तुम्हांला तरी तो व्यापाराचा उपद्व्याप कशाला पाहिजे ? काय घरीं खायला अन्न नाहीं ? दहा पिढ्या पुरण्याइतका पैसा आहे-मग तुम्हीं कां बाजारची उठाठेव करतां ? तुम्हांला मात्र महत्वाकांक्षा आहे-कर्तबगारीची हांव आहे—आणि मी तशीच हांव धरली तर तें मात्र पाप अं ! ( विजया व वरदा येतात ) आलांत ? या. हे पहा, मला वॉरंट घेऊन आले आहेत.

**वरदा**—लेखी का ? कीं नुसतं तोंडीच ? पोलीस शिपाई कुठं दिसत नाहींत ते !

**सर्वो०**—वरदे, हा थट्टेचा विषय नव्हे !

**विजया**—हें तुम्हांला कळलं पाहिजे—तिला नव्हे. मी पाहातें आहे—ती जीव तोडतोडून बोलते आहे आणि तुम्हीं नुसते मान फिरवून गालांतल्या गालांत हसतां आहांत ? दुसऱ्याच्या अंतःकरणाची तळमळ तुमच्या खिजगणतींत तरी आहे का?

**सर्वो०**—विजया, तूंच का बोलते आहेस ही ?

**विजया**—होय! असा कठोर निर्दयपणा पाहिला-तर गाईलासुद्धां वाचा फुटेल. मी तर जातीची स्त्री. तुमच्या कुंदेबद्दल जर मला कळवळा यायचा नाहीं तर यायचा तरी कुणाला ?

**सर्वो०**—समजलों-हा कट आहे. तुम्हीं दोघींनी कट करून हिला माझ्या घरांतून बाहेर काढली आहे. ठीक आहे—आतां एकदां बाबासाहेबाना भेटतों आणि तेही या कटांत सामिल आहेत असं दिसून आलं—( थांबतो. )

**वरदा**—तर काय करणार आहांत ?

**सर्वो०**—तर काय करणार आहें, तें तिलाच विचार. तिला चांगलं समजावून सांगितलं आहे. आइून ऐकायला त्यावेळीं तुम्हीं दोघी हजर नसाल ! ( जातो. )

**वरदा**—घाबरले बरं का ! तुला नाहीं असं वाटत ?

**विजया**—घाबरले नाहींत. पण या विषयावर अधिक कांहीं बोलायची त्यांची तयारी नव्हती, एवढं मात्र खरं ! ( कुंदेला ) काय सांगितलं तुला ? कसली तंबी दिली ?

**कुंदा**—कायद्याची !—कायदा नवऱ्याच्या बाजूचा असतो म्हणे !

**विजया**—आहे खरा. बायको पसंत नसली तर नवरा तिला टाकून देईल. दुसरी बायको करील-पहिलीला फार तर पोटगी देईल !-पण नवरा पटत नसला तर बायकोला त्याच्या इच्छेविरुद्ध, त्याला टाकून जातां येत नाहीं. दुसरं लग्न तर मुळींच करतां येत नाहीं.

**वरदा**—आग लावा या असल्या कायद्यांना !

**विजया**—कुणी लावायची आग ? तुझ्या माझ्यासारख्या पोरींना अधिकार नाहीं. सुमीसारखीला वाचा नाहीं—आणि पुरुषांनीं कां म्हणून हा अन्याय दूर करावा ? आमच्या अडचणींबद्दल त्यांना कां कळकळ वाटावी ?

**कुंदा**—त्यांच्या सोईचा आहे ना तो कायदा ? कायदे करणं किंवा मोडणं हें तरी त्यांच्याच हातीं आहे ना ?

**वरदा**—हे कायदे करायचं काम माझ्यासारखीच्या हातीं आलं पाहिजे. आजवर झालेल्या जुलमांचा या पुरुषांवर असा सूड घेईन म्हणावं—

**विजया**--म्हणूनच तें काम तुझ्या हातीं येतां नये. इथं सूड नको आहे, नुसता न्याय पाहिजे आहे. तसा कुणी एकादा पुरुष असेल-( पडद्यांत-विश्वनाथ-गेले का ते ? येऊं का बाहेर ?) कोण बोललं ?

[ वरदा व कुंदा आपसांत कुजबुजतात आणि हळुच आंत जातात. विजया इकडे तिकडे पाहाते, इतक्यांत विश्वनाथ येतो-ती दूर होते. ]

**विश्व०**--विजय-विजय-हा अबोला कां ?

**विजया**--कोण आपण ?

**विश्व०**—काय हा प्रश्न, विजय ?

**विजया**—मी आपल्याला ओळखत नाहीं.

**विश्व०**--मला ओळखत नाहीं ?

( **सावन**--एकताल )

**कां मनिं दया नाहीं । जिवा कां विसर होई ।**
**तुझ्याविण निराधार । हा हतसुख राहि पाहिं ॥ ध्रु० ॥**
**आस पास दिसे नाश । हतभागा या जिवास ।**
**काय झालि प्रेमलता । ये हुरहुर प्राण जाई ॥ १ ॥**

लहानपणापासून आपण एका जागीं वाढलों, खेळलों-आपल्या वडिलांनीं आपलं लग्न ठरवलं--

**विजया**—म्हणूनच ओळखत नाहीं. माणसाचं अदृष्ट घडवायचा अधिकार वडील माणसं हातीं घेऊं लागलीं, कीं जाणत्या मुलांना तो जुलूम वाटतो.

**विश्व०**—पण त्या बाबतींत आपणा दोघांचंही कधीं दुमत झालं नाहीं !

**विजया**—तेंच मोठं वाईट झालं ! वडिलांनीं ठरवलं आणि आपणही मान तुकावली-इथंच चूक झाली ! गुलामगिरीची सुरवात इथूनच झाली. मुकाट्यानं आपण तें कबूल केलं ! त्यांनीं ठरवलं ह्याचा आपण कधीं विचार केला का ? अंतःकरणाला पटलं का ? बुद्धीशीं पडताळून पाहिलं का ? दे ना याचं उत्तर ! प्रामाणिकपणानं बोलायचं तर ' नाहींच ' ह्मणावं लागेल

**विश्व०**—असं आहे खरं !

**विजया**—खरं आहे ना ? खरं आहे असं कळल्यावरसुद्धां तें तसंच का चालू ठेवायचं ? ती मानसिक गुलामगिरी नाहीं का होणार ? तुला गुलामाशीं का लग्न करायचं आहे ? बोल ना !

**विश्व०**—काय बोलूं? तूं असे हृदयावर घाव देऊं लागलीस तर काय बोलूं?

**विजया**—खरं बोल. पण माझी खात्री आहे, कीं तूं मुळींच बोलणार नाहींस. खरं बोललास तर साराच डोलारा कोसळेल, या भीतीनं तूं नुसतं हंसण्यावारी नेशील–किंवा नुसते सुस्कारे टाकशील. पुरुषांना जी बायको पाहिजे असते, ती गुलामच पाहिजे असते—म्हणून तूं मुळींच बोलणार नाहींस.

**विश्व०**–मी या गोष्टीचा मुळीं विचारच केला नाहीं. वडिलांनीं ठरवलं–मला तें पटलं!–एवढ्यावरच मी आनंदाचे मनोरे बांधित होतों. तुझा मतभेद होईल, ही कल्पनासुद्धां मला आली नाहीं.

**विजया**—खरोखरच नाहीं. कां यावी? तुझा वरपक्ष आहे–वरचष्मा आहे. तुझी परिस्थिती मजबूत पायाची आहे. मी स्त्री आहें–सुमीही स्त्री आहे!–तीही पहिल्यानं आंधळी होती. लग्न झाल्यावर तिचे डोळे उघडले–पण किती उशिरां! आतां त्याला उपाय नाहीं. तसं माझं व्हायला नको आहे–

**विश्व०**—मी सर्वोत्तमरावासारखा वागेन, असं तुला वाटलं तरी कसं?

**विजया**—सर्वोत्तमरावाच्या वर्तनामुळंच! लग्नापूर्वीं तो किती गरीब–किती प्रेमळ दिसत होता!—ठरल्याबरोबरच कांहीं त्यांचं लग्न झालं नाहीं. बाबासाहेबांनीं परिचय व्हायला त्यांना चांगलाच अवधी दिला होता. चांगलं एक वर्ष लग्न ठरून राहिलं होतं. त्यावेळीं कसा नाचत होता! किती गोड बोलत होता! मग आतांच त्याची भाषा कां बदलली? दे ना याचं उत्तर! लग्न झाल्यामुळंच ना?

**विश्व०**—तूं नुसतं वाईट तेवढं घेऊन चालते आहेस. चांगलं काय होईल याचा विचार मुळींच करीत नाहींस.

**विजया**—अगदीं बरोबर आहे. आज मी वाईटाचाच विचार करतें आहें. यापूर्वी मी सगळा स्वर्ग पाहात होतें प्रेमाच्या काव्यमय कल्पनांनीं भारून गेलें होतें. पण प्रेमाची कल्पना एकांगी आहे, असा आतां मला संशय येऊं लागला आहे. तुलाही नाहीं असं वाटत?

**विश्व०**—या अचानक धक्क्यानं मी सुन्न होऊन गेलों आहें. कांहीं सुचत नाहीं कीं रुचत नाहीं, असं होऊन गेलं आहे. सुखाच्या शिखरावरून अपेक्षा नसतां–इच्छा नसतां–एकदम कोसळून पडल्यामुळं माझा मेंदूच ठिकाणावर राहिला नाहीं, तिथं विचार कसला करणार?

( बागेसरी-एकताल )

**हाय घाय अवचित बसला । विकल झाल्या सबला हृदया ॥ धृ० ॥ मतिहत सहसा विचलित झाला । केंवि फिरावी ललना सदया ॥ १ ॥**

**विजया**--वरदा असती, तर तिनं यावेळीं म्हटलं असतं, 'वा रे पुरुष!' तुम्हीं पुरुष नोकरीचा विचार करतां, व्यापाराचा विचार करतां, धंदाउद्योगाचा विचार करतां, वैभवाचा विचार करतां- ! पण विचार करीत नाहीं एकाच गोष्टीचा. आणि ती गोष्ट म्हणजे लग्न. रूढीनं तुम्हांला बळकटी दिली आहे-कायद्यानं तुम्हांला पाठिंबा दिला आहे-वृत्तीनं तुम्हांला अेरावी दिली आहे, म्हणूनच तुम्हीं निर्धास्त असतां. आम्हां बायकांचं तसं आहे का ?

**विश्व०**--हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे खरा.

**विजया**--तर मग आतां घरीं जा. या चर्चेवर मनमुराद विचार कर. साधक बाधक परिणाम ध्यानीं घे-आणि मग माझी भेट घे. काय ठरवायचं त्याचा त्यावेळींच विचार करूं.

**विश्व०**--विजय--प्राणेश्वरी--

**विजया**--बस्स ! ही लाघवी-नटवी भाषा आतां पुरे झाली. कांहीं अर्थ आहे का त्या शब्दाला ? प्राणेश्वरी ! तुमच्या प्राणांची ईश्वरी मी आहें का ? मग तुमचे प्राण कुठं माझ्या मुठींत नाहींत ते ? कुठल्या तरी कवीनं घडवलेले अर्थशून्य शब्द घेऊन बायकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचे दिवस आतां संपले. हा व्यवहाराचा काल आहे. तीं तुमचीं रांगडीं काव्यं आतां केराच्या टोपलींत फेंकून द्या आणि 'एक नि एक दोन ' असली गणिताची कठोर भाषा सुरू करा. वरदा, इकडे ये पाहूं.

**विश्व०**--थांब, विजय, अशी कठोर होऊं नकोस. तूं सांगशील त्याप्रमाणं वागायची माझी तयारी आहे तूं देशील ती आज्ञा मी शिरोधार्य करीन. एका श्वासानं सुद्धां कधीं तुझा पाणउतारा करणार नाहीं. मग तर झालं ?

**विजया**--या कठोर संसारांतला भागीदार मला पाहिजे आहे !-समजलं ? माझ्या शब्दासरशीं उड्या मारणारं सर्केशींतलं माकड मला नको आहे. वरदा, सुमे, इकडे या पाहूं. ( दोघी येतात. ) या माझ्या माजी प्राणनाथाला बाहेरचा रस्ता दाखीव पाहूं.

**वरदा**--अहो-गंवडी--

**विश्व०**—थांब वरू–विजय, खरोखरच मी एक गंवडी आहें. पहिल्यापासून मी परिस्थितींचा विचार केला नाहीं. शाळेंत गेलों, शिकलों, मॅट्रिक झालों. मॅट्रिक होतांच प्रश्न पडला, कीं पुढं काय करावं! कारकुनी किंवा मास्तरकी करण्यापेक्षां कांहीं धंदा पत्करावा म्हणून इंजिनियरिंग कॉलेजांत गेलों. पास झालों. आज जरी मी दुसऱ्याच्या फर्ममधें नोकरी करतों आहें, तरी उद्यां स्वतंत्रपणें धंदा करण्याची मला धमक आहे--

**कुंदा**—आणि आम्हांला नाहीं वाटतं तशी धमक?

**विश्व०**--थांब सुमे,–स्वतंत्र होण्याची मला महत्वांकाक्षा आहे--

**वरदा**--आणि आम्हीं स्वतंत्र होऊं नये वाटतं?

**विश्व०**--थांब वरू. मी विजयेशीं बोलतों आहें—

**वरदा**—आतां विजया एकटी राहिली नाहीं–आम्हीं तिघीही एक आहोंत. तिघांचं जें मत, तेंच प्रत्येकीचं. समजलास विसूभाऊ? तिघींत फूट पाडून एकीवर सत्ता गाजवीन, असं तुला वाटलं असेल, तर तो तुझा भ्रम आहे.

**विजया**--उगीच कशाला बोलत राहिली आहेस? त्याला बाहेरची वाट दाखीव पाहूं.

**विश्व०**--विजय-विजय–एकच–अगदीं एकच शब्द–

**वरदा**—आतां एक नाहीं–दोन नाहीं–चलाव, निकलो यहांसे–(लोटीत नेते. विजया क्षणभर सुन्न होऊन राहते. कुंदा तिच्या तोंडाकडे तटस्थपणें पाहात असते. इतक्यांत वरदा फिरून येते) गेला एकदांचा. भली खोड मोडली गुलामाची!

**विजया०**--काय केलं मी हें? वरू–सुमे–मी चुकलें का?

(**कार्फा**–झपताल)

**विधि रचित वरदान। गतिरहित फिरत मन।**
**निराकार मतिमान॥ धृ॥ नुरलि गुणकामना। वासना**
**विधाना। प्रेमहत गति कठीण। उदासीन करिल मन॥१॥**

किती निर्दय मी?

**वरदा**—रक्तांतला गुलाम अजून डोकावतो आहे.

**विजया**--नाहीं वरू माझी खात्री आहे, विसू तसा नाहीं. पण पुनः वाटतं, लग्न झाल्यावर नवरेशाहीचा बादशहा जागा झाला तर! मी त्याची कसोटी पाहातें आहें. ही परीक्षा घेत असतांना मी मन कठोर केलं आहे खरं, पण स्त्रीजातीच्या

हृदयांतली ' आई ' अजून जागी आहे. तत्त्वासाठीं झगडावं लागतं आहे, पण स्नेहाचा ओलावा अंतःकरणांतून दूर झाला नाहीं, हें मला चांगलं जाणवतं आहे.

**वरदा**--स्नेह ? आई ! असं का ! गुलाम अजून मेला नाहीं !–

( पिलू--त्रिताल )

**झाली बावरी । आतां । करि घाई उगा नर नाथ व्हाया ॥ धृ० ॥ कां कैसा रुचे अनिवार । हा वाढे खुळा परिवार । वरमालेविना सजतां मराया ॥ १ ॥**

**नंदू**--( प्रवेश करून ) बाबासाहेब, बाबासाहेब. कुठं आहेत बाबासाहेब ?

**वरदा**--काय झालं आहे ? कोणत्या नात्यानं आला आहेस आज ?

**नंदू**--बडबडया माणसाशीं मी बोलत नसतों. मी आतां पूर्वीचा कवि राहिलों नाहीं. मी एक बिझनेस मॅन झालों आहें–सटोडिया झालों आहें. एका घटकेंत एक हजार रुपये कमावून आलों आहें.

**कुंदा**--आतां घालवणार केव्हां ते ?

**नंदू**--खरं आहे. पैसे घालवल्याशिवाय सट्टेबाजाला अस्सलपणा येत नाहीं. तेंही होईल बरं कुंदाबाई हेही पैसे जातील. ही विजया कां उगीच बसली आहे ? काय झालं ? हें पहा, विजय, त्या गवंडयाला विसरून जा. थोडासा माझ्या बाबतींत विचार कर. मी कांहीं तुझ्यावर सत्ता गाजवणार नाहीं मन मारून मरत नाहीं बरं. हें मन म्हणजे कोंकणच्या कांडरासारखं आहे जसजसे घाव घालावे, तसतसं वाढत जातं. तूं आपली माझ्याकडे पहा. व्यापाराच्या क्षितिजावर उगवणाऱ्या या नव्या ताऱ्यावर लक्ष ठेव, तुझा मार्ग सुलभ होईल. पण आधीं बोल-एकच शब्द बोल ! नाहींतर, आतां असंच–

( वैणिक काव्य )

**तूं बोलल्या विना मी नाहींच बोलणार । बोलाविल्या ना पाऊल टाकणार ॥ पुसल्याविना स्वयें तूं नाहींच सांगणार । पाहोनि रीत तूझी तैसाचि वागणार ॥ कोडें मना सुटेना कांहीं न होत बोध । भिन्नत्व सत्य हें कीं आभास हा विरोध ॥**

**वरदा**--नवं काव्य लिहितो आहेस वाटतं ?

**नंदू**--छेः छेः मी काव्य लिहीत नाहीं. नुसतीं दुसऱ्यांचीं काव्यं गाऊन दाखवतों. हें आमच्या काळे-कवींचं काव्य आहे. मोठं छान आहे. सर्वांनाच आवडतं तें. ( पुन्हां गाऊं लागतो. बाबासाहेब येतात. )

**बाबा**--अरे, हा भिकारी घरांत कसा शिरला ?

**नंदू**--भिकारी नव्हे बाबासाहेब, मी व्यापारी आहें--

**बाबा**--व्यापारी आणि भिकारी-दोन्ही सारखेच. एक मुळचाच भिकारी असतो पण आपल्याच धगाधगीनं व्यापारी शेवटीं भिकारी होतो.

**नंदू**--मी त्यांतला नाहीं बरं. तुम्ही काय समजलांत बाबासाहेब ? मी आतां सर्व व्यापाऱ्यांचं सम्मेलन भरवणार आहें. अध्यक्षासाठीं नांव तुमचं सुचवूं कीं विजयाबाईचं ?

**बाबा**--मी कांहीं व्यापारी नाहीं-पण या कारट्या मात्र आतां व्यापारी झाल्या आहेत. शेअरबाजारांत यांचीं नावं आज नोंदवलीं गेलीं आणि पहिल्याच दिवशीं-बरं का नंदू-जें टिप तुला दिलं-त्याच टिपच्या जोरावर यांचे लाखांचे दहा लाख झाले !

**वरदा**--हिप हिप हुर्रे !

**नंदू**--तर मग आतां जेवायला इथंच राहाणार. आज थाटाची मेजवानी घेतल्याशिवाय इथून जाईल त्याच्या आई दोन.

**बाबा**--राहा बरं. होऊन जाऊं दे, बरं का पोरींनों. याला आज घ्या पंक्तिपावन करून. पाहातेस काय सुमे-वाढायला सांग ना भटजींना !

**नंदू**--सट्टयाचं माहात्म्य अगाध आहे. आज या घरांत मला जेवायला मिळणार आहे-आणि ही वरदा मला आज जेवायला वाढणार आहे.

**वरदा**--बरं-बरं-वाढीन सुद्धां. आज मी खुषींत आहें कीं नाहीं ! कसं-विजय?

**विजया**--खरं आहे. क्षमाशीलता हें स्त्रीजातीचं भूषण आहे.

**बाबा**--भूकेची आग थंडावल्याशिवाय मला कांहींच सुचायचं नाहीं. आई वाढायला घे पाहूं.

**नंदू**--चला जेवायला !

**( पडदा )**

---

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ सर्वोत्तमरावाचा दिवाणखाना. सदोबा टेलिफोनच्या टेबलावर डोकें टेकून निजला असतां जयवंत येतो. ]

**जयवंत**--सदोबा-सदोबा-जागा हो ना! ( तो उठून आळोखेपिळोखे देतो. ) ही काय झोंप घ्यायची वेळ ?

**सदोबा**--आतां साऱ्याच वेळा सारख्या झाल्या आहेत. दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस होऊन बसला आहे. केव्हां उजाडतं आणि केव्हां मावळतं, कांहींच समजत नाहीं. टेलिफोन वाजला कीं जागं व्हायचं, बाकीची सारी झोंपच आहे की! पण हा बेटा टेलिफोन सारखाच वाजत असतो ना ?

**जयवंत**—असा जिवाला कंटाळल्यासारखा काय बोलतो आहेस? काय झालं आहे?

**सदोबा**--आतां आणखी काय व्हायचं राहिलं आहे? यापूर्वीं त्या बिचारीची नुसती दया येत असे-आतां वाटतं आहे, कीं धन्य ती माऊली! कसे दिवस काढित होती, तिची तीच जाणे!

**जयवंत**--कोण ती ?

**सदोबा**—दुसरी कोण? आमच्या शेटची बायको! खरी शहाणी म्हणून निघून गेली. असल्या नवऱ्यांच्या बायका कां पळून जातात तें आतां मला कळलं!

**जयवंत**--आणि मला सांगत होतास लग्न करायला!

**सदोबा**--मी कुठं सांगत होतों? शेट म्हणाले, म्हणून मी नुसता प्रतिध्वनी ग. तुला खरोखरच तसं सांगितलं असतं, तर आधीं मींच नाहीं का लग्न केलं . पण तें लग्न नको आणि बायकोचे ते तळतळाटही नकोत! आपला एकटा सदाशिव आहे, तो ठीक आहे. बाकी तुझं तसं नाहीं. तुझी नोकरी आहे

ठराविक वेळेची. ठराविक वेळीं घरीं तरी येतां येतं. लग्न करायला तुला कांहीं हरकत नाहीं!

**जयवंत**--मलाही तसंच वाटूं लागलं आहे. दादांनीही उत्तेजन दिलं आहे. पण त्यांनीं एक अट घातली आहे! वरदेशीं लग्न केलं तरच ते मला आपला वारस करणार आहेत. लग्नाच्या दुसऱ्याच दिवशीं मला एक वर्कशॉप काढून द्यायचं कबूल केलं आहे त्यांनीं!

**सदोबा**--हंः! त्यापेक्षां तुझ्या श्राद्धाच्या दिवशीं वर्कशॉप काढून देणार असं कां नाहीं सांगितलं त्यानीं!

**जयवंत**--असं कां म्हणतोस? तं इतकं का अशक्य आहे?

**सदोबा**--ती तुला घिसाडी म्हणते, तें कांहीं खोटं नाहीं! अरे, ती बायको का आहे? तिथं कोणता बायकोपणा दिसला तुला? नुसत्या मिशा आल्या नाहींत एवढंच. पण लेकाची पुरुषालासुद्धां लाजवील-( फोन वाजतो-उत्तर देतो ) 'घरीं नाहींत' म्हणून प्रत्येकाला सांगायचा कंटाळा आला बुवा आपल्याला. केव्हां केव्हां तर इथं बसलेले असले तरी 'नाहींत' म्हणून सांगावं लागतं. ( पुनः फोन वाजतो) यस्-जयवंत आहे आपला-दुसरं कुणीही नाहीं-नाहीं आल्या-( फोन ठेवून ) आतां कसल्या येतात त्या! त्या जगदंबेच्या पकडींत सांपडल्या आहेत ना? आणि तिच्याशीं तूं लग्न करणार! नवऱ्याची बायको टिकूं देत नाहीं, ती तुला नवरा म्हणून पत्करणार? अगदींच घिसाडी आहेस!

**जयवंत**--घिसाडी आहेस तूं! आतांच पाहाशील-ती इथं येणार आहे.

**सदोबा**--इथं येणार आहे? कशाला?

**जयवंत**--मला भेटायला!

**सदोबा**--तुझं श्राद्ध करायला! ( हॉर्न वाजतो. ) मोटर आणली आहेस वाटतं? होय? काय करूं रे, जरा मोकळीक मिळाली असती तर एक फेरफटका तरी मारला असता!

**जयवंत**--असं? ड्रायव्हर आहे माझ्या बरोबर. तिला भेटायचं आहे मला-अगदीं एकांतांत भेटायचं आहे. दुसरं कुणी नको आहे इथं. तुझ्या टेलिफोनची खबर मी घेईन. नुसतं 'शेट नाहींत' म्हणूनच सांगायचं ना? झालं तर. तूं जा मोटर घेऊन.

**सदोबा**--पण बघ, मी येईपर्यंत कुठं जाऊं नकोस. खुद्द शेटच असले तर म्हणावं, चहा घ्यायला गेलों आहें-किंवा असंच काहीं तरी सांग. भारी कंटाळलों आहें. एकदां करतोंच जिवाची मुंबई.-पण ती इथंच कां भेटणार आहे तुला ? तिच्या घरीं जाऊन तूं कां नाहीं भेटत तिला ?

**जयवंत**--म्हणूनच तुझं लग्न होत नाहीं तें ! या मख्ख्या तुला कळायच्या नाहींत. तूं आपला जा मोटार उडवीत.

**सदोबा**--तुरुंगांत पडल्यासारखं झालं होतं अगदीं. पण हें पहा, उत्तर मात्र बरोबर दे. नांवं तुझ्या ध्यानांत राहायचीं नाहींत. कुणाचे कॉल, तीं नांवं टिपून ठेव. ऐकेल ना तो तुझा ड्रायव्हर ?

**जयवंत**--मीं आधींच सांगून ठेवलं आहे त्याला. जा आतां. ती येईल तर तुझी कंबक्ती भरेल. जा. ( सदोबा जातो-फोन वाजतो-जयवंत उत्तर देतो. फोन ठेवतो. इतक्यांत वरदा येते.) यावं-यावं-

**वरदा**--सदोबा गेला वाटतं ?

**जय०**--मोटार मिळाली ना त्याला फुकटी ? गेला झालं ! आतां-

**वरदा**--बोला !-

**जय०**--बोलायचं काय ? मी बोलण्यापेक्षां तूंच काय तें समज. नुसतं होय की नाहीं, तेवढं उत्तर दे म्हणजे झालं.

**वरदा**--कसलं उत्तर देऊं ? आधीं प्रश्न काय आहे, तें तरी मला कळलं पाहिजे ना ?

**जय०**--प्रश्न !-तें पत्र-हें पहा, रागाऊं नकोस !-त्या पत्रांतला मजकूर आहे ना तुझ्या ध्यानांत ?-त्याचंच उत्तर दे.

**वरदा**--कुठं गेलं तें पत्र ? तें आतां माझ्या ध्यानांतसुद्धां नाहीं. पत्र कशाला हवं ? काय तें सांगा ना.

**जय०**--आतां कसं सांगूं ?--ऐक-सर्वोत्तमराव हे सुमीचे कोण ?

**वरदा**--आतां कोण नव्हेत. काडीमोडच झाला आहे म्हणाना त्यांचा !

**जय०**--पण त्यापूर्वी ते तिचे कोण होते ?

**वरदा**--त्यापूर्वी त्यांची ओळखसुद्धां नव्हती.

**जय०**--तेव्हां नव्हे-हल्लीं–काडीमोड व्हायच्या अगदीं लगत.

**वरदा**--तीं एकाच घरांत राहात असत.

**जय०**--कां राहात असत ?

**वरदा**--मूर्ख म्हणून.

**जय०**--तसं नव्हे–पण हा मूर्खपणा म्हणजे काय ?

**वरदा**--मूर्खपणाला मी मूर्खपणाच म्हणतें. त्याला दुसरं कांहीं नांव असलं, तर तें माझ्या हिशेबीं येत नाहीं.

**जय०**--तसलाच मूर्खपणा आपल्याला करायचा आहे.

**वरदा**--आपल्याला ? आपल्याला म्हणजे कुणाला ?

**जय०**--तुला आणि मला ?

**वरदा**--तुम्हांला वाटेल तें करा–पण मी नाहीं कसला मूर्खपणा करणार !

**जय०**--मूर्खपणा नको करूं–पण लग्न तर करशील ?

**वरदा**--एकूण एकच. कसलाच मूर्खपणा मी करणार नाहीं !–पण आता बरा तो शब्द आठवला.

**जय०**--परिचयानं जरा भीती कमी झाली ना ?

**वरदा**--परिचय ? हा साडेतीन मिनिटांचा परिचय हाच ना ?

**जय०**--तो काय थोडा झाला ? यापूर्वी एवढा तरी एकांत कुठं मिळाला होता आपल्याला ?

**वरदा**--साडेतीन मिनिटांच्या एकांतांत तुमची भीती इतकी कमी झाली. या हिशेबानं साडेतीन महिन्यांत तुम्हीं भलतीकडेच धीट व्हाल–आणि साडेतीन वर्षांत तर प्रत्यक्ष सुलतान बनाल !

**जय०**--कुणी सांगावं ? कदाचित् याच्या उलटच व्हायचं. तूंच सुलतान होऊन बसशील कदाचित् !

**वरदा**--मी मुळचीच सुलतान आहें. भीती होती तुम्हाला ! परिचयानं भीती नाहींशी होते तुमची. मला मुळीं भीतीच नाहीं, तिथं परिचय कशाला हवा ?

**जय०**--असं कसं म्हणतेस ? परिचयाशिवाय लग्न ठरवायचा काल आतां राहिला नाहीं.

**वरदा**--खरं का ?

**जय०**--तसा मला अगदीच घिसाडी ठरवूं नकोस. कारकुनी करायची नाहीं अशी माझी प्रतिज्ञा--म्हणून हा स्वतंत्र धंदा पत्करला. आतां तूं होय म्हटलंस, कीं माझं स्वतंत्र वर्कशॉप उघडतं आहे पहा !

**वरदा**--माझ्या होय म्हणण्यावर तुमचं वर्कशॉप कुठं अडून बसलं आहे ?

**जय०**--तें तसंच आहे. तूं 'होय' म्हणून तर पहा.

**वरदा**--आधीं वर्कशॉप उघडा आणि मग या मला विचारायला.

**जय०**--आतां हें कसं जुळावं ? तूं होय म्हटल्याशिवाय वर्कशॉप उघडत नाहीं आणि वर्कशॉप उघडल्याशिवाय तूं होय म्हणत नाहींस ! मोठं कोडं झालं आहे हें !

**वरदा**--पण हा परस्पर संबंध कसा काय आला आहे ?

**जय०**--तें असं आहे--( विश्वनाथ येतो.) आला हा ! सर्वोत्तमराव घरीं नाहींत

**विश्व०**--तें मला माहित आहे. ते येईपर्यंत मी इथं थांबणार आहें. त्यांनींच सांगितलं आहे.

**जय०**--ते यायचे नाहींत आतां.

**विश्व०**--मला माहित आहे--ते येणार आहेत.

**जय०**--आतां याला काय करावं ? तूंच सांग ना वरू.

**वरदा**--काय हो, गंवडी--

**विश्व०**--चूप ! तो तसला फाजिलपणा आतां चालायचा नाहीं. विसर तें पूर्वीचं नातं--

**वरदा**--विजयादेखील विसरलांत का ?

**विश्व०**--कुठली विजया ?

**वरदा**--असं का ? बरीच माणूसकी आलेली दिसते तुम्हांला ! बराच धीर केलात म्हणायचा !

**विश्व०**--मूर्खोशीं मी बोलत नसतों.

**वरदा**--अहो घिसाडी, ऐका म्हटलं.

**विश्व०**--मी त्याला नाहीं सांगत--

**वरदा**--मी तरी तेंच म्हणतें. तुम्ही बोलतां आहां माझ्याशीं आणि बोलत नाहीं यांच्याशीं. आतां तुम्हीच सांगा, मूर्ख कोण ठरतं ?

**जय०**—आम्हींच मूर्ख आहोंत ! पुरुष आहोंत ना आम्हीं ? पुरुष तेवढे सारे मूर्ख, असंच ना तुझं म्हणणं आहे ?

**वरदा**--कोण म्हणतं असं ? पुरुषांना मूर्ख म्हणण्याइतकी मी कांहीं मूर्ख नाहीं. बायका बहुतेक मूर्ख असतात–मी मात्र तशी नाहीं हं-पण त्या मूर्ख असतात म्हणून लबाड पुरुषांचं चांगलंच फावतं, एवढं मात्र खरं !

**विश्व०**--काय बोलतो आहेस तिच्याशीं जयवंत ? बोलायच्या लायकीची तरी आहे का ती ? शब्दाला किंमत असते आणि तो कुठं खर्ची घालायचा याचा पूर्ण विचार करावा लागतो. पैशाच्या उधळमाधळीपेक्षा शब्दाची उधळमाधळ जास्त दारिद्र्य आणते.

[ वरदा आणि जयवंत एकमेकांना डोळ्यानें खुणा करतात. वरदा फोनकडे जाते आणि विजयेला कॉल करते. ]

**विश्व०**--वरदा, ठेव तो फोन खालीं.

**वरदा**--मूर्खांचे हुकूम मी ऐकत नसतें.-( ती विजयेला बोलावित असतां विश्वनाथ अडवतो. )

**विश्व०**--ठेव तो फोन खालीं. कुणाला बोलवायचं नाहीं इथं.

**वरदा**—कुणाला कसलं–चांगली विजूला हाक मारतें आहें, तें ऐकूं नाहीं का येत ? घाबरट कुठले ! एका बायकोला भीतां ?–मुलीला ?–एका पोरीला भीतां ? मघाचं उसनं अवसान ओसरलं वाटतं ?

**विश्व०**--बस्स. या फोनला हात लावायचा नाहीं.

**वरदा**--तुम्हीं कोण सांगणार ? तुम्हीं काहीं इथले मालक नाहीं.

**विश्व०**--मला सर्वोत्तमरावांनीं इथं ठेवलं आहे.

**जय०**--नाहीं. हें मात्र खोटं. सदोबा इथं असतो आणि त्यानं मला इथं ठेवलं आहे.

**वरदा**--लबाडीदेखील धड करतां येत नाहीं ! ( हंसते. विजयेला बोलावते. )

**विश्व०**--वरू-वरू-काय केलंस हें ? कां म्हणून तिला इथं बोलावलंस ? मी काय तुझा अपराध केला आहे, म्हणून मला अशी संकटांत घालतेस ?

**वरदा**--तें मघांचं अवसान खोटंच वाटतं ? लबाडीसुद्धां बेमालुम करतां येत नाहीं !

**विश्व०**--खरोखरच नाहीं. मन आवरायचा किती प्रयत्न केला, पण पुनः जुनी वृत्ती उसळून वर येते. वरू, मी अजाण आहें, मूर्ख आहें, तूंच मला उपाय सांग. हृदयाच्या सांदीकोपऱ्यांतून लपून राहिलेली प्रेमाची लहरी, इच्छेविरुद्ध मला अशी तरंगायला लावते.

**वरदा**--ऐका, घिसाडी,-गंवडी काय म्हणतात ऐका.

**जय०**—मला नको आहे ऐकायला. माझी कबुली मी आधींच दिली आहे. आपल्याला कांहीं लबाडी करायची नाहीं.

**विश्व०**--मलाही लबाडी नको आहे. तिनं मला झिडकारलं-मी पहात होतों, तें झिडकारणं खरं नव्हतं. माझी खात्री आहे, ती माझी कसोटी पाहात होती. मला जणीं उत्तरं देतांना तिला कष्ट होत होते, हें माझ्या प्रेमी हृदयाला जाणवत होतं बोल वरू, ती आतां इथं आली तर मी काय करूं ?

**वरदा**--तें मी कसं सांगूं ? मी कांहीं पुरुष नाहीं. रुसलेल्या वल्लभेबरोबर कसं खोटं बोलायचं, तें कुठल्या तरी पुरुषालाच विचारा. यांना विचारा ना !

**जय०**—मला ? आपल्याला नाहीं बुवा त्यांतलं काहीं कळत.

**विश्व०**--वरू-वरू-अशी कां निर्दय होतेस ? सांग ना. तुला सर्व कांहीं माहित आहे. तूं तिला ओळखतेस तशीच मलाही ओळखतेस. ती कां रागावली आहे, तें तुला माहित आहे. मला काहींच माहित नाहीं. मी काहीं तरी अंदाज करतों आहें. तो बहुधा चुकीचा असेल. नव्हे-माझी खात्री आहे, कीं तो माझा अंदाज चुकीचा आहे. वरू, कांहीं सुद्धां अपराध नसतां मला ही शिक्षा होते आहे, याचं तुला कांहींच का वाटत नाहीं ?

**वरदा**--अहो घिसाडी, जरा बाहेर जाऊन माझी वाटत पाहातां का ?

**जय०**--पण इथं फोन आला तर ? बिचाऱ्या सदोबावर दोष यायचा.

**वरदा**--मी देतें फोनचं उत्तर. जा. ऐकलं ? मी येतें आहें-मी बाहेर येतें आहें. आपण मग तिकडेच बोलूं. काय ? इथं नको. हा आहे ना इथं ? जा आतां.

( तो पहात पहात जातो. ) ऐक, विसुभाऊ, ही लढाई तत्वासाठीं आहे. कुणाचा इथं गळा कापायचा नाहीं. पण तूंच पहा–सुमीच्या संसाराचं मातेरं झालं आहे. असं कां झालं? तो सुमीचा अपराध आहे का? नाहीं ना? सर्वोत्तमरावांचाही अपराध नाहीं. ऐक–खरोखरच त्यांचा अपराध नाहीं. हा परिस्थितीचा दोष आहे. ही परिस्थितीच आम्हांला बदलायची आहे. समान हक्कांचं बुजगावणं आम्हांला नको आहे. आम्हांला स्त्रीदाक्षिण्याची मेवामिठाईही नको आहे. जें पाहिजे आहे, तें सत्य पाहिजे आहे. दोन्हींत भेद नको आहे. उच्चनीचतेची बाष्कळ भावना नको आहे. समजलं? ऐक–असं कर, जरा उसनं अवसान कायम ठेवायचा प्रयत्न कर–( हॉर्न वाजतो. ) छेः, आली वाटतं ती! आतां काय तुला सुचेल तसं वाग. देवानं अक्कल दिली आहे तिचा उपयोग कर.–नमस्कार–( जाते. विश्वनाथ स्तब्ध बसून राहतो. विजया येते. )

**विजया**—कोण? अस्सं? वरू–वरू–हें काय? वरू कुठं गेली? काय हो, वरू कुठं गेली?

**विश्व०**—इथं कांहीं माझ्या खिशांत नाहीं! असती इथं तर दिसली असती.

**विजया**—तेवढं मला कळतं. पण ती इथंच होती ना?

**विश्व०**—असेलही कदाचित! कदाचित् नसेलही!

**विजया**—तिनं मला फोन करून बोलावलं!

**विश्व०**—तेवढ्याचसाठीं ना लोक फोन घेतात?

**विजया**—तें मला कळतं. पण तिनं कशाला बोलावलं मला?

**विश्व०**—तें मी काय सांगूं? मी कांहीं वरू नाहीं!

**विजया**—विसू–

**विश्व०**—बस्स–असला लघळपणा मला मुळींच आवडत नाहीं. कोण विसू? चांगलं ' विश्वनाथपंत ' म्हणतां येत नाहीं?

**विजया**—असं का? केव्हांपासून एवढी अक्कल आली?

**विश्व०**—तें तुलाच चांगलं माहीत आहे.

**विजया**—कुणाला ' तुला ' म्हणतां? चांगलं ' विजयाबाई ' म्हणतां येत नाहीं का?

**विश्व०**--विजू--

**विजया**--विसू--

**विश्व०**--विजू, आतां किती दिवस ही बतावणी चालवणार ?

**विजया**--बतावणी ? म्हणजे हें ढोंग ठरवलंस ?

**विश्व०**--ढोंग नव्हे. नुस्ता परीक्षेचा पेपर !-खरं सांग, विजू--

**विजया**--मी खोटं बोलत असतें, असा का तुझा आरोप आहे ?

**विश्व०**--तसं नव्हे. तो नुसता औपचारिक शब्द होता.

**विजया**--औपचारिक शब्द मला नको आहेत !

**विश्व०**--मलाही ही खोटी बतावणी नको आहे !

**विजया**-ही बतावणी म्हणायला तुला आधार काय ?

**विश्व०**--तुझा शब्द-ही आतांची तुझी वृत्ती-ही चेहेऱ्यावर दिसणारी मनाची खळबळ ! विजू, लबाडी करायलाही जातिवंत लबाड असावं लागतं. हें तुझं उसनं अवसान तुला दगा देतं आहे बरं.

**विजया**--नाहीं-नाहीं-विसू, निश्चयपूर्वक मी सरसावलें आहें. मनाला कष्ट होत असतील-नाकबूल कां करूं ?--मला कष्ट होताहेत-यातना होताहेत-पण परिणामावर दृष्टी ठेवून त्या मला सोसल्या पाहिजेत.

( देस--त्रिताल )

**विसर मज नाहिं काहिं सुचेना। कठिण पुढिल पथ**
**दावि निराशा। सुखविकास नच, शांति रुचेना ॥धृ०॥**
**खंति न जीवा। नाहिं विसावा। कां यावा जय**
**मनिंच्या गाना ॥ १ ॥**

गुलामगिरीच्या जन्मजात जाणिवेचा अंतःकरणांतून नायनाट होईपर्यंत, पडतील ते कष्ट सहन करणं मला भाग आहे.

**विश्व०**--ती जाणिव कशी नाहींशी होणार ?

**विजया**--तेंच मला माहित नाहीं. एकादा शोधक, प्रयोगशाळेंत शोध लावतांना परिणामाच्या कालाची जशी पर्वा करीत नाहीं, अमुक एक गोष्ट अमुक एका

प्रकारेंच झाली पाहिजे असा आग्रह धरीत नाहीं, नुसती यशावर नजर ठेवून कामाला लागतो, तशीच मी या कामीं सरसावलें आहे. काळवेळाची मला पर्वा नाहीं, क्लेश-यातनांची मला क्षिती नाहीं, मान-अपमानाची मला खंत नाहीं; माझा प्रयोग यशस्वी झाला, कीं माझं कार्य झालं. त्यापायीं माझा देह पडला तरी मला त्याची पर्वा नाहीं.

**विश्व०**--तुझ्या या कार्यांत मी तुला कोणती मदत करूं ? काय केलं म्हणजे तुझं समाधान होईल ? तुझ्या कार्याचं महत्व मला कळतं. तें यशस्वी झालं पाहिजे अशी माझीही इच्छा आहे पण त्यासाठीं मी तुला काय मदत देऊं ? तूं सांगशील तें ऐकायची माझी तयारी आहे.

( पूर्या--त्रिताल. )

**वचनामुळें मन हें फसलें । करुणायुता तुजला कळे ॥ धृ० ॥ प्रणयाकुला मति-भावुका । गतिवंचिता तव सेवका । चरणांबुजीं पद दे बळें ॥ १ ॥**

**विजया**--गुलामाप्रमाणं मला जसे मिळतील ते हुकूम पाळायचे नाहींत, तसेंच डिक्टेटर बनून कुणाला हुकूमही सोडायचे नाहींत. जिथं गुलामगिरीही नाहीं, आणि डिक्टेटरशीपही नाहीं, अशी परिस्थिती मला पाहिजे आहे. तशी परिस्थिति येईपर्यंत मी कुणाला ' पायाचा दास ' बनविणार नाहीं किंवा कुणाची ' पायाची दासी'ही होणार नाहीं. ( सदोबा येतो. )

**सदोबा**--अरेच्चा, हें काय, इथं काय भुताटकी चालली आहे ? जयवंत काय झाला ? वरदा कुठं आहे ?

**विजया**--वरदा इथं होती ?

**सदोबा**--इथं आली असावी, असा माझा कयास होता. पण जयवंत मात्र इथंच होता आणि शेट इतक्यांत यायचे होते. ( कुंदा येते. ) अरे बापरे ! आतां ! आतां काय करूं ? ( कुंदा विजयेच्या कानांत सांगते. विजया जाते. )

**कुंदा**—सदोबा, चालता हो इथून.

**विश्व०**--हें काय सुमे, तो बिचारा हुकुमाचा ताबेदार-त्याला कशाला संकटांत घालतेस ?

**कुंदा**—माझी मी मुखत्यार आहें–तुह्मांला इथं बोलायचं कारण नाहीं. ( फोन वाजतो–ती उत्तर द्यायला जाते. )

**सदोबा**--माफ करा बाईसाहेब, माझ्ा गरिबाचा गळा कां कांपतां ?

**कुंदा**--( फोनवर ) चार हजार गांसड्या घ्या म्हणावं-शेटनींच सांगितलं आहे–मी बायको त्यांची–ते जरा आजारी आहेत–बिनदिक्कत घ्या–हो–हो–त्याच दरानं. ( सदोबाला ) यांतला एक शब्द त्यांना सांगशील तर तुझा मुडदा पाडीन.

**विश्व०**--सुमे, काय हें ?

**कुंदा**--हा व्यापार–ही शेअरबाजारची कारवाई–तुला गंवड्याला यांत कांहीं कळायचं नाहीं.

**विश्व०**--सर्वोत्तमराव इतक्यांतच येतील.

**सर्वो०**--( प्रवेश करून ) येतील कां ? हा पहा आलों. सद्या, परकी माणसं या घरांत कां ?

**सदोबा**—हे म्हणाले, तुम्हींच बोलावलं आहे म्हणून.

**सर्वो०**—मी यांच्याबद्दल बोलत नाहीं--

**सदोबा**--तर मग दुसरं कोण परकी आहे इथं ?—त्या ना ?--त्या बाई-साहेब ना ? इथल्या मालकीण ना ?

**सर्वो०**--इथं एकटा मी मालक आहें. हात धरून बाहेर काढ.

**सदोबा**--कुणाला ?

**सर्वो०**--हिला. परकी माणसं इथं नको आहेत यावेळीं. मला विश्वनाथपंताशीं कांहीं खासगी बोलायचं आहे. ऐकलंस सदोबा ?

**कुंदा**--मी कांहीं कुणी परकी नाहीं म्हणावं—ऐकलंस सदोबा ?

**सर्वो०**--सद्या–गाढवा–परवां माहेरीं माझा अपमान केलास, तेव्हां ही अक्कल कुठं गेली होती ?

**कुंदा**—माझी अक्कल काढतोस काय सदोबा ? तुला आहे का कांहीं अक्कल ?

**सर्वो०**--सद्या–जीभ फार लांब होऊं लागली ! ठाऊक आहे ? असली फाजिल जीभ उखडून काढीन.

**कुंदा**--माझेही हात कांहीं केळीं सोलायला गेले नाहींत बरं सदोबा ! जितका अधिकार तुम्हांला आहे--तितकाच मला आहे बरं सदोबा !

**सर्वो०**--या अधिकाराच्या गमजा कुणाला सांगतोस सद्या ? लाथ मारून घराबाहेर काढीन, तेव्हां कळेल. सद्या, काय ? ऐकूं येतं आहे कीं नाहीं ?

**कुंदा**--देवानं मला चांगले कान दिले आहेत बरं, सदोबा. चांगली ऐकतें आहें. असली छाती तर काढा पाहूं, सदोबा, मला घराबाहेर !

**सर्वो०**--सदोबा, हिला हात धरून बाहेर काढ.

**सदो**--तो अधिकार शेटसाहेबांचा आहे. कुठल्याही स्त्रीचा हात धरला तर तें पाणिग्रहण होतं ना ?

**सर्वो०**--कुंदे, घराबाहेर हो.

**कुंदा**--ठीक ! पहा सदोबा, पहा विसुभाऊ, हे आपण होऊन मला घराबाहेर घालवताहेत.

**सर्वो०**--हो-हो-भितों कीं काय कुणाच्या बापाला ?

**कुंदा**--पहा सदोबा, विसुभाऊ, मी आपखुषीनं इथं आलें होतें-यांनीं स्वतः होऊन मला घराबाहेर घालवलं आहे. ठीक ! माझं सामानसुमान माहेरीं पाठवून द्या म्हणावं ! जाऊं मी ?

**सर्वो०**--हो-हो-जा-( विश्वनाथास ) कां ? असं कां विचारते ही ?

**कुंदा**--ठीक. ही चाललें. ( जाते. )

**सर्वो०**--थांब-थांब ! विश्वनाथ, मी चुकलों का ? विश्वनाथ, काय झालं हें ?

**सदोबा**--कांहीं तरी चुकलं यांत शंकाच नाहीं.

**सर्वो०**--गप रहा रे ! जाऊं दे तें-विश्वनाथ, मी तुला बोलावलं होतं तें अशासाठीं कीं--

( **पडदा** )

---

## प्रवेश दुसरा

( रस्ता—जयवंत व नंदू प्रवेश करतात. )

**नंदू**—खरोखरच ती फार हुषार आहे, यांत शंका नाहीं. मला आश्चर्य वाटतं तें हेंच, कीं तिला हीं संधानं कशी कळलीं ?

**जय**—हें आंख आणि फरक काय आहे बुवा ?

**नंदू**—तुला घिसाडयाला काय कळणार त्यांत ? तूं आपला कार्बुरेटर साफ करित बैस. पण त्या कार्टीला हीं संधानं कशीं कळलीं ? किरकोळ चिठ्ठया द्यायचं काम मी करीत असतों, हा सुगावा तिला कसा लागला ?

**जय०**—तें कांहीं आपल्याला माहित नाहीं. तिनं सांगितलं तें तुला सांगितलं. रक्कम माझ्याजवळ दिली ती तुझ्या सुपुर्द केली. ती तुझी तेजी काय–नि मंदी काय–नि भाव ना भाव काय—यातला आपल्याला एक शब्द कळेल तर शपथ ! तिनं सांगितलं त्याप्रमाणं तुझ्याकडे पाढा वाचला. मला तरी तें वेदाइतकंच अगम्य होतं.

**नंदू**—खेळणारांतली अट्टल दिसते बेटी ! तुला माहित नाहीं जयवंत—सारे मोठमोठे व्यापारी या आंकफरकाच्या भानगडींत असतातच—पण उघड बोलत नाहींत. एरव्हीं सर्वोत्तमरावाची आणि माझी दोस्ती कुठली व्हायला ? पण हा आंखाचा दुव्वा आहे ना मधीं सांधायला ! तेवढ्यासाठीं रातोरात त्यांच्या—माझ्या बैठकी होतात. तूं आतां त्यांतच आला आहेस म्हणून बोलतों आहें—पण या गोष्टी बोलायच्या नव्हेत.

**जय०**—व्यापारच आहे ना हा ? मग बोलायला काय झालं ?

**नंदू**—बाबारे, हा व्यापार नसलेला व्यापार आहे. सारे लोक हा व्यापार करतात—पण तसं उघड सांगतां येत नाहीं. शेअरबझारसारखी इथं उघडी सट्टेबाजी नाहीं—रेससारखा कायद्याचा पाठिंबाही नाहीं. ही शिरजोरीची चोरी आहे. सारं कांहीं करायचं, पण उघड उघड करायचं नाहीं. बागुलबुवाची भीती आहे ना ?

**जय०**—यांतलं कांहींच कळत नाहीं आपल्याला ! आपण आपले हुकमाचे ताबेदार. ( बाबासाहेब येतो. ) चूप—बाबासाहेब येताहेत.

**नंदू**--येऊं देत. तेंही माझं गिऱ्हाइकच आहे.

**जय०**--आं ? खरं कीं काय ? मला नव्हती ही कल्पना ! बरं, माझे स्वतःचे-

**बाबा**--असं का ? तूंही शिरलास का या व्यापारांत ?

**जय०**--नाहीं. मी--

**नंदू**--हं-हं-सावध. या कानाचं या कानाला कळवायचं नाहीं घरदार-नातंगोतं-सारं कांहीं सामसूम !-सावध ! सावध ! ! ( बाबासाहेबांना ) बरं-आज फीचर कीं आंख ? कुठलं बीट घ्यायचं ?

**बाबा**--आंखांत काय झालं आहे ?

**नंदू**--ठीक आहे. तसं कांहीं वाईट नाहीं.

**बाबा**--मग दोन्हीही घे. पण चिठी देतांना लाईन मारून दे. सारखी लाईन मारून मग बाजारांत काढ. पण ज्या मोठी चिठीवाल्याकडे जाणार आहेस तिथं कांहीं भीती नाहीं ना ?

**नंदू**--छेः छेः, भीतीचं नांवच काढूं नका. सेक्शन बांधून टाकले आहेत-अगदीं दोन्हीही. पण आज अकरा दिवस अमेरिका बंद झाली आहे म्हणे !

**बाबा**--ठीक, अमेरिका बंद झाली तर लिव्हरपूल. खरा व्यापार हाच आहे बेट्या. एरव्हीं कुठं एकाचे नऊ मिळणार ? पण कुठली खबर आहे ?

**नंदू**--पंखेबुवाची आहे-वरळीच्या बुवाची आहे-माहिमच्या पीराची आहे. शिवाय घोमे ज्योतिषाचीही आहे. पण आपला विश्वास आहे बुवा पंखेबुवावर.

**बाबा**--ठीक ! तुला वाटेल त्या खबरीवर आंकडा लाव. पण लाईन मारायला मात्र विसरूं नकोस.

**जय०**--छेः छेः, आपल्याला तर हा नुसता मंत्रजागर वाटतो आहे. एक शब्द कळेल तर शपथ. चालूं दे तुमचा वेदघोष. मी आपला जातोंच कसा. माझी चिठी घेतलीस ना ?

**नंदू**--चूप-एवढ्या मोठ्यानं बोलूं नकोस ! कुठं कोण खबरी असेल, त्याचा नेम आहे का ? ( जयवंत जातो. ) बाबासाहेब, आपण नुसते बाजारांत खेळतां असा माझा समज होता; पण इकडे आंखफरकावर केव्हांपासून खेळूं लागलां ?



नंदू—मला द्या ना दत्तक ! ( अंक-३ प्रवेश-२ )

**बाबा**--बाबारे, कपाशीचा संबंध जिथं जिथं येईल, तिथं तिथं हात टाकल्या-वांचून गत्यंतर नाहीं. जिथं माझा जांवई आहे, तिथं माझ्या मुली ह्या असायच्याच. पोरीच्या मागनं काठी टेंकित धांवावं लागतं! करतोस काय ? मला स्वतःला कशाला हवेत हे उपद्व्याप! पण ती कार्टी माझा जीव खाते ना ? गडगंज भरलं आहे घरांत-स्वस्थ बसून खावं म्हटलं, तर पोरी मला अशा नाचवायला लागल्या आहेत.

**नंदू०**--खरंच, मुलगा नाहीं ना तुम्हांला ? मला घ्या ना दत्तक !

**बाबा**--या पोरी माझा सत्यानाश उडवताहेत तो थोडा, म्हणून का तुला दत्तक घेऊं ? नको बेट्या, यांतूनच आधीं मोकळं होऊं दे मला. यांतच जर सफा झालों, तर घेईन तुला दत्तक. पुढं पाणी द्यायला आधार होईल.

**नंदू**--सफा झाल्यावर कोण लेकाचा होणार आहे दत्तक! नको-हें आहे हें ठीक आहे. कमिशनवर भागतं आहे तेवढं पुरे आहे! शिवाय एक-दोन आणे-वाल्यांचे पैसे सरळच जातात ना खिशांत! हा व्यापार फार चांगला बरं बाबासाहेब-लेख नाहीं-पावती नाहीं-तिकीट नाहीं-घ्या घ्या म्हणून पैसे देतात ते नुसते खिशांत टाकायचे! कवितेचा बुरखा आहेच कायमचा पांघरलेला! त्यांतून निघालाच एखादा खबरी, तर कुणाचं तरी संमेलन भरवतों. संमेलनाचं ऑफिस म्हटलं, कीं त्या नांवाखालीं हव्या तशा चिठ्ठया घेतां येतात.

**बाबा**--खरं म्हणशील नंदू, तर मी या दगदगीनं कंटाळलों आहे! केव्हां एकदां या नवराबायकोचा समेट होईल, असं मला झालं आहे. तोही ऐकत नाहीं आणि हीही ऐकत नाहीं. आतां यांनीं कपासखरेदीचं सिंडिकेट करायचा बेत केला आहे.

**नंदू**--कुणी ? कुंदेनं का ?

**बाबा**--आतां एकटीच कुठं आहे कुंदा ? तिघींही एक झाल्या आहेत आणि बाजारांत कपाशीवर खेळणाऱ्या कांहीं गुजराती बायकाही त्यांना मिळाल्या आहेत. जपान्यांशीं वाटाघाट करताहेत बेट्या !

**नंदू**--संभाळा बरं-या जपान्यांच्या झटापटींत नाक चपटं होऊन जाईल म्हणावं! मोठे भयंकर लोक आहेत ते!--( वरदा येते. ) बरं का, वरदाबाई, या जपान्यांशीं सावध रहा बरं!

**वरदा**--इतक्या भीती घ्यायला आम्हीं कांहीं पुरुष नाहीं बरं! तुमच्या अमदाबाद-मुंबईवाल्यांपेक्षां जपानीच बरे. व्यवहाराला तरी चोख असतात. पण

या तुमच्या देशी व्यापाऱ्यांची आपसांतली लाथाळी पाहिली, कीं खेड्यावरच्या कुणबी बायासुद्धां बऱ्या वाटतात.

**नंदू**—तें मात्र खरं आहे. हे मुंबईवाले अमदाबादवाल्यांवर आणि अमदाबादवाले मुंबईवाल्यांवर खार खातांना पाहिले, कीं वरदे, तुझं म्हणणं अक्षरशः पटूं लागतं.

**वरदा**--बरं का बाबा, तुम्ही आता इथं वेळ घालवूं नका. जिथं बसाल, तिथं बसाल, असं आहे तुमचं. रस्तासुद्धां दिसत नाहीं तुम्हांला. पांच वाजायला झाले— दिसताहेत का ? बंद होईल ना बाजार ?

**बाबा**--पाहिलंस नंदू, कशी हुकूम सोडते आहे मला ? जसा कांहीं मी हिच्या बापाचा नोकरच ! करतां काय, पत्करलं आहे खरं. निस्तारलं पाहिजे ना ? (जातो)

**वरदा**--बाबा गेले तें बरं झालं, नाहीं ?

**नंदू**--काय सांगावं ? कदाचित् बरं होईल—कदाचित् वाईटही होईल.

**वरदा**--कोंडवाड्यांत एकांत शोधण्यापेक्षां असली गर्दीची जागा फार चांगली ! आकांतासारखा उत्तम एकांत नाहीं. नाहीं ? नंदू, माझ्याबद्दल तुझं काय मत आहे ?

**नंदू**--आकाशांत तारे किती आहेत, तें विचारिनास मला !

**वरदा**--असं काव्य करूं नकोस, गड्या. या नव्या व्यवहारांत तुझी जी मदत मला मिळते आहे, ती पाहिली म्हणजे वाटतं, जन्माचा सोबती असावा तर असाच असावा.

**नंदू**--आंखफरक की जय !

**वरदा**--असं थट्टेवर नेऊं नकोस, मी अगदीं खरंखरं बोलतें आहें.

( पहाडी—कजरी—केरवा. )

**या जीवनाला । विसराया । तृषा हे शमाया ही झालें**
**मी कुरंगी ॥ध्रु०॥ जैसी मृगी जला । तशी मी अबला ।**
**दिनीं दिनीं प्रेमा । जिवाचा निवाला ॥ १ ॥**

**नंदू**--असे काळजावर घाव देऊं नकोस, वरदे. पहा, किती झालं तरी मी कवि ! असलं कांहीं कुणी बोललं—कुणी म्हणजे पुरुष नव्हे हो—कुणी असं बोलूं लागलं, कीं आधींच लोण्यासारखं असलेलं माझं हें हृदय वितळूं लागतं.

**वरदा**--वितळलेलं लोणी देखील थंडीनं थिजतं, हें सैंपाकघरांतलं सायन्स तुला माहित आहे ना? प्रेमाच्या थंडीची झळ जर तुला आवडत असेल--

**नंदू**--आगीच्या फुफाट्यांत थंडी कुठली सांपडणार बाई?

**वरदा**--अग्नीतच थंडी असते, हें आइन्स्टाइनचं शास्त्र अजून तुला कळलं नाहीं वाटतं?

**नंदू**--शास्त्र असलं, तरी तें अनुभवाला पटलं पाहिजे ना?

**वरदा**--ठीक. पंखेवाला बुवा तुला माहित आहे ना? त्याची प्राप्ती काय आहे?

**नंदू**--बेसुमार!

**वरदा**--चव्व्या-पंजावर लावलेले पैसे बुडायची त्याला भीति आहे का?

**नंदू**--मुळींच नाहीं. त्यानं मिंडीचं नांव घ्यावं आणि त्यावर आम्ही बुडावं! तो मात्र सहीसलामत शाबूत असतो. त्याचा व्यवहार उक्ता आणि बिनधोक!

**वरदा**--आहे ना? चल तर-मी तुला एक नवा मार्ग दाखवतें.

(जातात.)

---

## प्रवेश तिसरा

[ सर्कल गार्डन-बाकांवरून कांहीं लोक बसले आहेत व कागदावरील आंकडे ताडून पाहात आहेत. सर्वोत्तम व विश्वनाथ येतात. ]

**सर्वो०**--भंडावून सोडलं या बायकांनीं. बायकांचं सिंडिकेट! कोण उर्मटपणा हा! आणि हे व्यापारी त्यांच्याशीं व्यवहार करतात! पैशापुढं या लोकांना कांहींच का दिसत नाहीं?

**विश्व०**--व्यापारी तेवढे इथून तिथून सारखेच! कुणाला वगळायचं त्यांत? कुठल्या व्यापाऱ्याला पैशाखेरीज कुठं कांहीं दिसतं आहे?

**सर्वो०**--समजलों-तुझी खोंच माझ्या ध्यानांत आली. व्यापारांत आम्ही-आम्ही नव्हे, मी नुसता पैशाकडेच पाहातों खरा! पण बायकांशीं व्यवहार! शरम वाटली पाहिजे या लोकांना!

**विश्व०**—तेवढं मात्र खरं आहे. उमटपणालाही मर्यादा आहे. हा मूर्ख थेरडा त्या पोरीच्या ओंजळीनं पाणी पितो आहे. लाखांची खाक व्हायला या कपाशीच्या व्यवहारांत कितीसा वेळ लागणार ? पोरींचे लाड झाले तरी किती करायचे ? आतां हें माझंच पहा, वाङ्निश्चय ठरला लहानपणापासून—पण तिनं मला धुडकावून दिलं—आणि आतां व्यापारांत शिरली आहे ! सुखाचा संसार थाटला असता तर दोघंही सुखी झालों असतों;—पण त्या म्हाताऱ्याच्या चिथावणीनं आतां कपाशीचा व्यापार करते आहे म्हणे !

**सर्वो०**—गांठ माझ्याशीं आहे म्हणावं ! जपान्यांना झुकवून सारी भडोच उमऱ्याची कपास कॉर्नर करून बसल्या आहेत या बायका !—दर वाढवायला तरी कांहीं नियम ? पण नाहीं—शेकड्यानीं वाढ केली आहे ! उद्यां गाडं आंगलट येईल तेव्हां कळेल म्हणावं.

**विश्व०**—मला भीती वाटते आहे तीच—

**सर्वो०**—आपल्या कर्मानं मरत असल्या त्या, तर त्यांत तुला कसली भीती ?

**विश्व०**—तें नाहीं म्हणत मीं. मी म्हणत होतों, बिल्डिंग कॉन्ट्रॅक्ट्स् बाजूला टाकून मी तुमच्याबरोबर घुसलों आहे इकडे—पूर्वीची कांहीं संवय नाहीं—म्हणून जरा भीती वाटते, एवढंच.

**सर्वो०**—कॉन्ट्रॅक्टस्‌मध्यें मिळवून मिळवून काय मिळवणार आहेस ? एकादे दिवशीं आंकडा लागून जाईल तर एका दिवसांत लखपती होशील. त्याची भीती नको. तुझं जोखीम मी घेतलं आहे. पण तेवढी कामगिरी बजाव. त्यांच्या गटांत घुसलं पाहिजे—

**विश्व०**—त्याची काळजी नको. असं बेमालुम काम करतों.

**सर्वो०**—हीच त्यांची इथं यायची वेळ. मी आड होतों—त्या दिसल्या म्हणजे ठरल्याप्रमाणें नाटक करूं. त्या पहा येताहेत—( जातो. सदोबा येतो. )

**विश्व०**—( सदोबाला डोळा घालून ) आहे ना ध्यानांत ? ( तो खुणेनें होकार देतो. कुंदा व विजया येतात.) तुला एकवार सांगतों सदोबा, तुझ्या धन्याशीं एक शब्द-सुद्धां बोलण्याची माझी इच्छा नाहीं. लग्नाच्या बायकोशीं ज्या माणसाचं पटत नाहीं, तो परक्या माणसांशीं काय व्यवहार करणार ? माझा धंदा मला पुरेसा आहे. तुझ्या शेटची भागीदारी मला नको आहे !

**सदोबा**—देव देतो आणि कर्म नेतं! चालून आलेली लक्ष्मी घालवतां आहांत बरं!

**विश्व०**—घरची लक्ष्मी बाहेर घालवणारानं असला उपदेश स्वतःसाठीं राखून ठेवावा!

**कुंदा**—( विजयेला ) ऐकलास कसा सिद्धसाधकपणा चालला आहे!

**सदोबा**—सांगायचं काम मी केलं. ऐकायचं किंवा न ऐकायचं तुमचं तुमच्या हातीं आहे. तिथं दुसरा काय सांगणार? अमेरिका बंद झाली आहे. इकडला भाव वधारला आहे-त्याचा फायदा घ्यायचा असला तर घ्या. ( सर्वोत्तम येतो. ) मी सांगायचं तें सांगितलं, पण यांना पटत नाहीं, त्याला मी तरी काय करूं?

**सर्वो०**—ऐकलंस विश्वनाथ, तुझ्या फायद्याची गोष्ट तुला सांगतों आहें. यांत एक शब्दसुद्धां खोटा नाहीं. मला वेळ होता म्हणून सदूला पाठवला. आतां मीच आलों आहें. काय तुझ्या शंका आहेत त्या सांग पाहूं

**विश्व०**—शंका कांहींच नाहीं. मला माणसाच्या वृत्तीकडे पाहायचं आहे. मी स्पष्ट सांगतों, तुमची वृत्ती मला आवडत नाहीं.

**सर्वो०**--माझी वृत्ती? कुठली माझी वृत्ती?

**विश्व०**--त्या दिवशीं तुम्हीं आपल्या पत्नीला घराबाहेर घालवलीत? आप-खुषीनं ती आली होती-कुणी सांगावं?-कदाचित तिला पश्चात्तापही झाला असेल, पण अत्यंत अपमानास्पद भाषा वापरून तुम्हीं तिला बाहेर हांकलून दिलं?-ही माणुसकी झाली का?-उद्यां ही केस कोर्टात गेली तर--

**सर्वो०**--गेलीच आहे. तिनं माझ्यावर दावा लावला आहे!

**विश्व०**--ठीक. तिनं माझी साक्ष काढली तर मला खरं सांगावं लागेल. तुम्हीं आपल्या व्यवहारांत मला कां ओढतां आहांत तें मला चांगलं कळतं. हे उपकार नव्हेत-मैत्रीचं लक्षणही नव्हे-हा लांच आहे. भागीदारीचं मधाचं बोट लावून तुम्हीं माझं तोंड बंद करूं पाहात आहां, हें न कळण्याइतका मी बावळट नाहीं.

**सदोबा**--माझीदेखील साक्ष निघायची कदाचित्!

**सर्वो०**--कदाचित् कां?-खात्रीनं!

**विश्व०**--मग तूं काय करणार आहेस, सदोबा?

**सदोबा**--आपण बुवा कधीं खोटं बोलणार नाहीं. मग त्यासाठीं नोकरी गेली तरी चालेल.

**विश्व०**--शाबास !

**सर्वो०**--सद्या, हीं भिकेचीं लक्षणं आहेत बरं !

**सदोबा**--आज तरी कुठं एवढा कुबेर आहें मी ?

**सर्वो०**--ठीक. तुह्मीं सारे उलटलांत तरी मी माझा शब्द खरा करीन, तरच नांवाचा सर्वोत्तमराव ! ( जातो. )

**सदोबा**--खरंच नाहीं ना मला घालवून लावायचे ?

**विश्व०**--चूप-त्या ऐकतील-

**सदोबा**--( मोठ्यानें ) गेली तर गेली नोकरी-भीक मागेन, पण या कुबेरापुढें मान वांकवणार नाहीं. ( कुंदा व विजया पुढें येतात. ) कसं काय चाललं आहे बाईसाहेब ?

**कुंदा**--कुठल्या नाटक कंपनींत असतोस हल्लीं ?

**सदोबा**--नाटक कंपनींत? म्हणजे ?

**कुंदा**--आतां हें चाललं होतं हें नाटक नव्हे तर काय ?

**विश्व०**--कुंदाबाई, माणसावर आरोप करतांनासुद्धां कांहीं विचार करावा लागतो ! सदोबावर आरोप करतांना हा आरोप माझ्यावरही येतो आहे ना ?

**कुंदा**--आरोप कसला? खरंच आहे तें ! तुह्मी दोघेही सारखेच नाटकी आहांत !

**विश्व०**--ही बदनामी आहे-हा गुन्हा आहे--

**कुंदा**--मग दावा आणा ना !

**विश्व०**--सारींच माणसं कांहीं तुमच्यासारखीं एकदम कोर्टांत धांवणारीं नसतात.

**कुंदा**--तें परिस्थितीवर अवलंबून असतं. तुम्ही पुरुष आहांत ना ?

**विजया**--काय बोलते आहेस असल्या नाटकी माणसांशीं ?

**विश्व०**--असं का ? तुम्हां लोकांसाठीं मी चालत आलेली लक्ष्मी दवडली--आणि त्याचं बक्षिस हें ! बायकांची जातच मुळीं कृतघ्न !

**विजया**--चालत आलेली लक्ष्मी म्हणे ! प्रत्यक्ष बायकोला जो विचारीत नाहीं, त्याला तिसरा माणूस काय होय ?

**विश्व०**--तसाच प्रसंग आला, म्हणजे आपला जसा परका होतो, तसाच परकाही आपला होऊं शकतो. भूकंपाच्या धक्क्यानं डोंगराची नदी आणि नदीचाही डोंगर होत असतो.

**कुंदा**--भूकंप? कुठला हा भूकंप? त्या दिवसचा भूकंप का सदोबा?

**सदोबा**--बाईसाहेब, अशी थट्टा करूं नका. जिवावर उदार होऊन आम्ही तुमचा कैवार घेतला, त्याला असा उणेपणा आणूं नका. सगळीच वेळ कांहीं सारखी नसते!

**कुंदा**--काय ढोंगं चाललीं आहेत एकेक!

**विजया**--चल पाहूं इथ आलों हीच मुळीं चूक झाली. रोज कुणी नसतं--आजच कसे आले एकेक?

**कुंदा**--पाळत ठेवली असेल! पुरुष आहेत ना हे!

**( मिश्र कांबोजी--एकताल )**

**केंवि निरखितां सुरंगी। नेत्र खुळा होऊनि मारी ॥धृ०॥ दाविताति व्यंग कांहीं। धांव घेति ठायीं ठायीं। छंद लाविति वंचन-कामीं। संधानीं विंदाना निंदा ही सारी ॥ १ ॥**

**विश्व०**--विजू--( ती दूर होते. ) अशी कां कठोर होतेस?

**सदोबा**--येतों बरं विश्वनाथपंत. कुठं भेटाल?--आतां माझे शब्द तुम्हांला कुठले ऐकूं येणार म्हणा! चालूं द्या--कांहीं झालं तरी हा एकटा जीव सदाशीवच राहाणार! ( जातो. )

**विश्व०**--विजू--विजू--अजूनही तुला माझी दया येत नाहीं का?

**कुंदा**--कां दया यावी? दया येण्याजोगं असं तुम्हीं काय केलं आहे? आतांचं तें नाटकच ना?

**विश्व०**--होय.

**विजया**--काय, तें नाटकच? ढोंग? अगदीं सरळ कबूल केलंत!

**विश्व०**--होय! पण तें कां, केलं हें सांगण्याचं स्थळ हें नव्हे. सुमे--

**कुंदा**--समजलं! मी जायला हवी ना? जाणारच होतें मी! एवढं का मला कळत नाहीं?

**विजया**--तें ढोंग ना ! जगांत प्रामाणिकपणाच राहिला नाहीं का ?

**विश्व०**--तें जितकं ढोंग होतं--तितकंच खरंही होतं. सर्वोत्तमरावाच्या दृष्टीनं तें ढोंग होतं. त्याला ढोंग वाटावं म्हणून मी तें खरं बोलत होतों. आपण विभक्त झालों आहोंत असा त्याचा समज होता. त्यासाठीं त्यानं मला भागीदारीचा लांच देऊं केला. त्याची भागीदारी मला नको आहे. मी तसंच त्याला सांगितलं--पण त्याच्यासाठीं मी तुम्हांला फसवतों आहें, असं त्याला दिसावं म्हणून जें बोलत होतों, तें मात्र अंतःकरणांतलं हृद्गत होतं.

**विजया**--माणूस एकदां खोटं बोलूं लागला म्हणजे त्याला खऱ्याखोट्याचा विवेकच राहात नाहीं. कोणतं खरं आणि कोणतं खोटं, हें निश्चयानं सांगतांसुद्धां येत नाहीं. बोलतांना देखील किती त्रेधा उडते आहे तुझी ! कां एवढा अट्टाहास हा ?

**विश्व०**--तुझ्यासाठीं--विजू, तुझ्यासाठीं. कोणत्या उपायानं तुझं मन वळवावं, याचा विचार करूं लागलों. सर्वोत्तमरावानं आपण होऊन मला हाताशीं घेतलं, त्याचा फायदा घेऊन तुम्हांला उपयोगी पडावं, एवढ्याचसाठीं मी भानगडींत पडलों. विजू, या भानगडी मला आवडत नाहींत. असल्या लपडावाचा मला तिटकारा आहे. पण मी तरी काय करूं ? हृदयावरचा हा आघात कसा सावरून धरूं ?--

( **संपूर्ण--मालकंस**--त्रिताल. )

**माया विरे ममता नुरे । हा घाय मातें विषसमा ॥ धृ० ॥ मांडि समता खेळ कुणाचा । विविध भावा विसरावें या अविषमा ॥ १ ॥**

**विजया**--मर्दासारखे मर्द तुम्हीं--तुम्ही असे खचून कां जातां ? विनवणीनं बायका वळतात, असा का तुमचा समज आहे ? कर्तबगारीची आवड जितकी पुरुषांना आहे, त्याच्या शतपटीनं बायकांना आहे. हजारों वर्षं तुम्हीं आम्हांला नादान बनवून ठेवलं आहे, म्हणूनच आम्हांला ही बंडाची लहर येते आहे !

( **बहार**--त्रिताल )

**विलासिता उदासिता मला समा । सुखछाया मिरवाया । मज सबल करि सदा । या जगतिं कुणी ।**

**ना शशि-तरणी । तमगत गगना । नच कुणि दिनमणी ॥ ध्रु० ॥ सुखमय परिणय हा गणि ललना । कां विकल मना विकसित वदना । मदांध नर परी । तया हृदयिं धरी ॥ १ ॥**

तुमच्याशीं आमचा लढा आहे, ते तुम्हींच जर असे खचूं लागलां, तर आम्ही दोन हात करावे कुणाबरोबर ?

**विश्व०**--विजू, ही स्फूर्ति तुला कुठून आली ? प्रेमाच्या आणि काव्याच्या साम्राज्यांत तंद्रा लागलेली तूं-तूंच अशी कशी उसळून उठलीस ?

**विजया**--ही सहानुभूती !-विसू, सुमेचं गृहसौख्य तूं पाहिलंस; होय ना ? तुलाही माझ्यासारखं कां वाटलं नाहीं ? तुला वाईट वाटलं खरं, पण तुला चीड कां आली नाहीं ? तुझं रक्त उसळून कां उठलं नाहीं ?-बोल ना !

**विश्व०**--क्षमा कर विजू-हा माझा अपराध आहे खरा !

**विजया**--हा तुझा अपराध नाहीं. हा परिस्थितीचा दोष आहे--

**विश्व०**--वरदा त्या दिवशीं असंच म्हणाली--

**विजया**--अगदीं बरोबर म्हणाली. परदुःख परशीतळ आहे बरं, विसू. माझी खात्री आहे, कीं स्त्रियांची सहानुभूती पुरुषांना वाटणार नाहीं; गुलामांची आबाळ धन्याला केव्हांही डांचणार नाहीं; जितांचा खरा कळवळा जेत्यांना येणार नाहींच नाहीं. आमचीं दुःखं आम्हांलाच कळतात, म्हणून आम्हींच त्याचं निराकरण करूं-किंवा निवारण करूं. दुसऱ्यांची सहानुभूती-दुसऱ्यांची कींव-विशेषतः तुमच्यासारख्या जेत्यांची कींव आम्हांला डागण्या देण्याइतकी दुःसह होते.

**विश्व०**--याला उपाय काय ?

**विजया**--याला उपाय तुझ्या हातीं नाहीं, किंवा माझ्याही हातीं नाहीं. मी तुला एकदां सांगितलं ना-सुमीचं संसारसौख्य थाऱ्यावर आल्याशिवाय मी कसल्याच गोष्टीचा कोणताच विचार करणार नाहीं. एक खरं-कीं आतां वाङ्निश्चयाचा संबंध मात्र काडीभरही राहिला नाहीं.

**विश्व०**--ठीक आहे. तुझंच म्हणणं खरं आहे. वडिलांनीं घडविलेली ती

गुलामगिरी आपण तोडून टाकूं–नव्हे टाकलीच आहे. आतां नव्या ओळखीनं–नव्या नजरेनं नवीं नातीं जोडूं–हेंच खरं–

( अडाणा––त्रिताल. )

**निरवधि वरिलि मलिनता । असला प्रेमा विषम गमला जीवें अविरत फसला । देहा गेहा विसरुनि स्वतांला । पाडि मोहिं मज मधुकर सम भान जाइ नितांत । अधिगत मजसि जगिं रडवि ॥ धृ० ॥ सुख परिकर दिसलें असतां । कुणि पुसे कुणा वेदांता । करगत निधिला हरविला निरविला कां अभिमत नसतां । अखिल कुटिल प्रणयदान करि काय जगिं सुहित ॥१॥**

आतां नवा डाव–नवा पाव ! ( जातो. )

**विजया**––पुनःही तसंच झालं. काय केलं मी हें ?

( मांड––धुमाळी. )

**हांसवि नाचवि हृदयाला । हा हृदयनाथ टाकुनि गेला । भासवि हा रवि रजनीला । कां रजनिकांत हा दिवसाला ॥ धृ० ॥ हा काय रंजविल ललना सुमना । स्वानंदें आनंदें धाला ॥ १ ॥**

**कुंदा**––( प्रवेश करून ) ऐकलंस विजू, ही वरदा म्हणजे खरोखर सैतान आहे. बोलते किती गोड–किती मंजूळ–पण अशी अचाट बुद्धी चालवते !

**विजया**—काय केलं तिनं ?

**कुंदा**—असा बेमालुम डाव टाकला–पण इथं कांहीं न बोलणंच बरं. चल, तिकडे ऑफिसांत जाऊं. बाबा वाट पाहात असतील. ( जातात. कांहीं लोक इकडून तिकडे जातात. इतक्यांत सदोबा व जयवंत प्रवेश करतात. )

**जय०**—खरं म्हणतोस ? आपल्याला हे प्रकार कांहीं माहित नाहींत बुवा ! या प्रांतांत मी नवखाच आहें ना ! त्यामुळं पहिल्यानं जरा चुकल्यासारखं वाटतं.

**सदोबा**--अरे, हें हटकून काम आहे. तूं तिला सांग. कॉटन मार्केटांतले डाव खेळत बसण्यापेक्षां हा अ खफरकाचा धंदा हटकून हमखास ! आमचे शेटदेखील खेळत असतात. हल्लीं या बागेंत जो एक बुवा आला आहे, त्याच्या टिपसा गेल्या चार दिवसांत अगदीं बिनचुक आल्या. सर्वांचीच श्रद्धा बसली आहे त्याच्यावर. तूं वरदेला घेऊन ये. पाहिल्याबरोबर तिची खात्री होईल. आमच्या शेटसारख्या संशयी माणसाचा विश्वास बसला, तिथं इतरांची काय कथा ? तो पहा आला-- ( नंदू बुवाच्या वेषांत बरोबर माणसांचा मोठा घोळका. )

**नंदू**--बसा-सारे बसा इथं ! तो भाग्यशाली माणूस कोण दिसतो आहे तिथं ? ( जयवंताला खूण करतो व तो येतो. ) तिला का नाहीं आणलीस ?

**जय०**--कुठल्या तिला ?

**नंदू**--तुझी प्रेयसी-तुझी वल्लभा-मोठी भाग्यशाली आहे ती !-व-काय समजलास ? शारदेचा अंश ! तिला सांग-हाताला पंजा असतो-जा-(ध्यानस्थ बसतो.)

**जय०**--म्हणजे काय रे सदोबा ?

**एक**--एवढं कळत नाहीं ? पंजावर लाव.

**दुसरा**--नाहीं रे. हात दोन असतात ना ? दुव्यावर लाव !

**एक**--तूं माझं ऐक-दुव्यावर लाव आणि पंजावरही लाव दोहोंपैकीं एक कुठला तरी हटकून येणार. एकावरचे बुडाले तर बलाय गेली म्हणावं.

**नंदू**--( डोळे मिटून ) जा-आतां एक क्षण जास्त राहाशील तर ठार बुडशील. ( सदोबा जयवंताला लोटून घालवून देतो. ) ऐक-कपाशीच्या पुत्रा-ऐक ! सर्वांत उत्तम असेल त्यानं इथं यावं. ( सदोबा खुणावतो. सर्वोत्तम येतो व एक नोट त्याच्यापुढें टाकतो. ) उचल-उचल तो कपटा-फेंकून दे दूर ! चार दिवस अनुभव आला ? पाच वाजता ठोकर खाल्लीस ? आतां दिडावर नजर ठेव. रेषा मार, पांडवांना जवळ घे. वेदांना चाट दे आणि ब्रह्मस्वरूप हो. जा. खिशांत हात घालूं नकोस, द्रव्य आम्हांला विष्ठेसमान आहे.

**सर्वो०**—चांगलंसं समजलं नाहीं.

**एक**--हें पहा. एक्क्यापासून पंजापर्यंत धरा-पांच पांडव. छक्क्या ते नवव्यापर्यंत सोडा-चार वेद. आणि ब्रह्म म्हणजे शून्य-मिंडि धरून लावा किंवा लाईन मारा. रेषा-आणि बाजारांत काढा !

**नंदू**--जा-नको-थांब-अर्धा कलाक थांब-

**सर्वो०**--पण पांच वाजतील ना तितक्यांत? कॉटन मार्केट बंद होईल ना?

**नंदू**--होऊं दे. भिऊं नकोस. दिडावर नजर ठेव. चला-वरळीला चला (जातो.)

**सर्वो०**--मन मोठं पेचांत पडलं आहे सदू. ऐकावं तरी कठीण न ऐकावं तरी कठीण. वेळ जवळजवळ भरत आली. चार दिवसांचा अनुभव नसता तर याचा एक शब्दसुद्धां ऐकला नसता. कसा चोहोंबाजूंनीं गांजून गेलों आहें. अमेरिका बंद झालेली-लिव्हरपूरमध्यें ठार बुडालों-भडोच उमरा या बायकांनीं कॉर्नेर केलेला-कापडबाजारांत जपान्यांचा शह-तो सेठ्ठई कामिमुरासुद्धां उलटला, त्या बायकांच्या सिंडिकेटला सामिल झाला! त्या दिवशीं कुंदेनं माझ्या नांवानं चार हजार गांसडया खरीदल्या. अब्रूसाठीं कबूल करावं लागलं आणि एका फटक्याला चाळीस हजारांची ठोकर बसली. काय करूं? सदू, काय करूं? विष खाऊन जीव द्यायचा प्रसंग आहे! ( नंदू येतो ). ये नंदू—

**नंदू**--गेला वाटतं तो?

**सदोबा**--कोण?

**नंदू**--वरळीचा बुवा! कुठं गेला तो?

**सदोबा**--वरळीचा बुवा इथं कोटांत कशाला येईल?

**सर्वो०**--काय बोलतोस त्याच्याबरोबर? सांगितल्याप्रमाणें कर जा. असतील नसतील ते सारे! काय?-मागंपुढं पाहूं नकोस. ( सदोबा जातो. )

**नंदू**--शेट, हा विश्वासघात होतो आहे. ओपनिंग समजल्याशिवाय लावणार कसं? तुम्हीं कांहीं टिप सांगत नाहीं. ओपनिंग नि क्लोझिंगवर लावायला हें कांहीं पुणं नव्हे. मुंबईंत ओपनिंग क्लोझिंगवर चालत नाहीं ना? आणि तुम्हीं तर टिप देत नाहीं. आजवर गुपचुप तुमचं काम करित आलों. आंखफरकावर तुम्हीं खेळतां हें कळलं तर बाजारांत तुमची बेअब्रू होईल, म्हणून तुमचं जोखीम माझ्या शिरावर घेत आलों; आणि आतां वरळीच्या बुवाचे आंकडे माझ्यापासून लपवतां?

**सर्वो०**--खरोखर सांगतों, वरळीचा बुवा कोण तो मला माहित सुद्धां नाहीं.

**नंदू**--असं? मग आतां सदोबाला कुठं पाठवलंत?

**सर्वो०**--नित्याच्या व्यवहारासाठीं.

**नंदू**—कुठला नित्त्याचा व्यवहार ? कॉटन ग्रीन, शेअर बजार कीं आंखफरक ?

**सर्वो०**—नित्त्याचा म्हणजे नित्त्याचा. यापेक्षां जास्त कांहीं सुद्धां मला सांगायचं नाहीं.

**नंदू**—ठीक. आतां माझा मार्ग मोकळा आहे. ( वरदा येते ) आलीस ? पहा हे पहा तुझे मेहुणे-हे आंखफरकावर आंकडे लावून जुगार खेळतात. तुला माहित आहे ? बाजारच्या इतर व्यापाऱ्यांना माहित आहे ?—नसलं तर सांग. पुरावा मी देईन. चिठ्ठया माझ्या हातीं आहेत.

**वरदा**—ठीक. हें कळलं हें एक उत्तम झालं. ( बाबासाहेब येतो. ) काय झालं बाबा ?

**बाबा**—सारी कपास कॉर्नर केली. एकदम साठांनी भाव वधारला.

**वरदा**—ठीक-आतां सर्वोत्तमरावाची कपास बाहेर निघाल्याशिवाय भाव वधारूं द्यायचा नाहीं, असं सिंडिकेटला सांगा. रोज भाव घटत जाऊं दे. किती तग धरतात, तें तरी पाहूं.

**सर्वो०**—चांडाळणी, कां हात धुवून माझ्या मागें लागली आहेस ? माझ्या बरोबर इतर व्यापारी मरतील त्याची काय वाट ?

**वरदा**—सारे पुरुष व्यापारी जरी खलास झाले तर त्यांत आह्मांला आनंदच आहे.

**बाबा**—मी नाहीं हो यांच्या व्यापारांत. बरं कां नंदू ! मी नुसता या सिंडिकेटच्या कारकुनाचें काम करित असतों. कुणीही खलास झाले तर त्याचं मला सोहेर नाहीं कीं सुतक नाहीं.

**नंदू**—

**आधीं असते पुष्कळ सोबत [। कितीक ' मी, मी '**
**मजला दिसती । पुढें चालतां भरभर मरती । मरुनी**
**माझ्या ठायीं जगती । माझीच मला उरते संगत । एक**
**तपेली द्या मज आणुनि ।**

( गोविंदाग्रज )

**बाबा**—कशाला ? भीक मागायला ?

**नंदू**--मला नव्हे यांना-तें माझं काव्यगायन यांच्या वतीनं होतं. ( कुंदा व बेलीफ येतात ) कोण ? कुंदाबाई ? हा बेलीफ कां तुमच्या बरोबर ?

**कुंदा**--हेच ते. आता समन्स बजाव. चुकवित होतां का ?

**नंदू**--वरलीच्या बुवाचा प्रसाद !

**सर्वो०**--कसलं समन्स ?

**कुंदा**--माझ्या दाव्याचं.

**नंदू**--पहा हो, हे सर्वोत्तमराव-कापडाचे बडे व्यापारी-यांची ही बायको, कोटाच्या भर वस्तीत पोटगीसाठीं यांना समन्स लावते आहे पहा !

**सर्वो०**--तोंड दाखवायला जागा राहिली नाहीं !

**नंदू**—

**पुष्पाविण येई वास । वाऱ्याविण चाले श्वास । हर्षाविण आतां हास । मरणाविण सुटका झाली । ही एक आस मनिं उरली । कन्हैय्या बजाव बजाव मुरली ॥**

( गोविंदाग्रज )

( पडदा )

# अंक चवथा

[ विजयेचा हॉल, फोन वाजत असतां पडदा उघडतो. बराच वेळ कुणी उत्तर देत नाहीं. आचारी येऊन फोनकडे पाहात राहातो. त्याला हात लावण्याचा धीर होत नाहीं. इतक्यांत बाबासाहेब येतात. ]

( बाबासाहेब फोनला उत्तर देतात. )

**बाबा**— काय वेडा आहेसरे ! सारखी घंटा वाजत होती तरी उत्तर दिलं नाहींस ?

**आचारी**——छेः बुवा ! भीती वाटते आपल्याला. परवां दिव्याचं बटन दाबायला गेलों, तर असा झटका बसला ! तसंच व्हायचं कांहीं तरी ! आणि ती काय घंटा वाजते ! च्यः ! इकडे वाजते–तिकडे वाजते–सारखी घंटाच वाजत असते ! कुठल्या यंत्राची कुठली घंटा तेंच कळत नाहीं मला ! ( बाहेरची घंटा वाजते. ) आणखी बाहेरची घंटा ! भंडावून सोडलं या घंटानीं ! ( जाऊन पाहून येतो. ) सर्वोत्तमराव आले आहेत——

**बाबा**—येऊं दे त्यांना आंत ( सर्वोत्तमराव येतो ) वाः–माणूस यायचीसुद्धां वाट नाहीं पाहिलीत ! वरदा असती तर तिनं आंत येऊं दिलंच नसतं !

**सर्वो०**—नाहीं ना ती इथं ? छान झालं ! ( इकडे तिकडे पाहून) अगदीं कॉटन ब्रोकरच ऑफिसच थाटलं आहे जस ! इतक्या थोड्या दिवसांत केवढा फरक हा ! मला मोठा अभिमान होता–कोटांत ॲस्क्विथ लॉर्डसारखं कापडाचं बडं दुकान थाटून बसलों होतों. शिवाय दलाल स्ट्रीटमधलं ऑफिस—पण तीं ऑफिसं थाटायला मला कित्येक वर्षं लागलीं——

**बाबा**—पण या पोरींनीं तुम्हांलाही दिपवून टाकलं. किती थोड्या वेळांत त्यांनीं बाजार काबिज केला पहा !

**सर्वो०**—केसरबेन भेटली म्हणून ! शिवाय त्या दोघी पार्शिणी–ती युरोपियन बाई–साऱ्याच बायका कशा उलटल्या आमच्यावर ? घरचा धूर्तपणा या बायकांना बाजारांत उपयोगी पडला. कसून व्यापार चालवला आहे सर्वांनीं.

**बाबा—**तें मला सर्व माहित आहे. यांत नवीन तें काय सांगितलंत ? एवढेंच सांगायला आलां असाल, तर तुमचे श्रम व्यर्थ गेले बरं जावईबुवा !

**सर्वो०**—जावईबुवा ! आतां कसला जावईबुवा ! जावई गेला–आतां नुसता बुवाच राहिलों आहे. उद्यां भगवं चढवायची पाळी टळली तर मिळविली. बाबा-साहेब, तुम्हीं सुद्धां यांना मदत करावी, सामोपचाराच्या चार गोष्टी सांगून वाटेवर आणूं नये, हें आश्चर्य आहे !

**बाबा**—मी तरी काय करणार ? मुलगा नाहीं, कांहीं नाहीं. उद्यां मी मेलों तरी इस्टेट त्यांनांच ना जाणार ? मेल्यावर माझ्या इस्टेटीचं काय झालं, याची यमाच्या दरबारीं बसून काळजी करण्यापेक्षां आपलं याची देहीं याची डोळां सत्यनाश झालेला पाहणं भाग्याचं नव्हे का ?

**सर्वो०**--असं तर खरंच. पण व्यवहाराची कोणती गोष्ट कधीं तुम्हांला पटली आहे ? कांहीं तरी माथेफिरूपणा असला तरच तो तुम्हाला पटतो. आज इतकीं वर्षे पाहातों आहें--

**बाबा**—पहातां आहां ना ? मग आतां विचारण्यांत काय अर्थ ?

**सर्वो०**—बोलल्याशिवाय राहावत नाहीं म्हणून बोललों. बाकी तोही माझा वेडेपणाच आहे म्हणायचा !

**बाबा**—कळलं ना हें ? भाग्यच म्हणायचं ! आतां काय काम आहे तें चटकन् सांगून टाका पाहूं. त्या पोरी आल्या तर जसा माझा जीव खातील, तसाच तुमचाही पाणउतारा करतील, याची कल्पना आहे ना तुम्हांला ? करतां काय ? पुरुषांच्या जातीचा थोडा अभिमान बाळगला पाहिजे ना ?

**सर्वो०**—तुम्हांला कसं पटेल याची जरा शंका वाटते मला ! पण असं पहा, या एकंदर प्रकरणांत तुम्हांला कांहीं हात घालतां येणार नाहीं का !

**बाबा**—कोणत्या प्रकरणांत ?

**सर्वो०**—या सर्वच प्रकरणांत. बाजारांतल्या, कोर्टातल्या वगैरे साऱ्याच प्रकरणांत !

**बाबा**—( हंसतो ) आतां काय सांगावं तुम्हांला. त्या पोरींचा माझ्यावर विश्वास का आहे ? चांगलं स्वतःचं घर असतांना ऑफिस इथं विजयेच्या घरीं कां थाटलं आहे त्यांनीं ? माझ्यावर विश्वास आहे म्हणून ? तेव्हांच ही पाळी ना आली तुम्हांला ? नुसतं कारकुनासारखं राबवताहेत मला !

**सर्वो०**—बाजारांत माझी केवढी बेअब्रू झाली आहे, याची कल्पना आहे का तुम्हांला ? प्रत्यक्ष माझी बायको बाजारांत उघड उघड मला सामना देते आहे—डावावर डाव टाकून मला चीत करते आहे—त्यामुळं तोंड वर करायाची सोय राहिली नाहीं मला. तिथ सारा पतीवरचा व्यवहार—पण आतां अशी बेपत झाल्यावर कोण मला थारा देणार ?

**बाबा**—याचा विचार पूर्वीच करायला पाहिजे होता. त्यावेळीं ती कांहीं काम या म्हणत होती—वर्किंग पार्टनर म्हणून काम करायला तयार होती—तुम्हीं तसाच आग्रह धरला असता, तर माझ्याकडचं भांडवल मी आनंदानं तिच्यासाठीं दिलं असतं. तिला भागीदारींत घेतली असतीत—

**सर्वो०**—भागीदारींत ? बायकोला भागीदारींत ?

**बाबा**—कां ? आतां ती स्वतः करतेच आहे कीं नाहीं उलाढाली ? तुम्हांला शह दिलेच आहेत कीं नाहीं तिनं ?

**सर्वो०**—हो—तेंही खरंच. पण या कसल्या उलाढाली ? त्या दिवशीं त्या बुवाला हाताशीं धरून मला तोंडघशीं पाडलं आणि तिकडे कॉटनमधें मला खो दिला. खोटे आंकडे देऊन आंखांत फसवलं ! हाच कीं नाहीं या बायकांचा व्यापार ?

**बाबा**—आणि तुम्हीं पुरुष तरी अधिक तें काय करतां ? तुम्हींही नाहीं का याच नमुन्याच्या भानगडी करीत ?

**सर्वो०**—तेंही खरंच. खरं बोलायचं तर नाहीं म्हणतां यायचं नाहीं. बरं, आज काय चाललं आहे त्यांचं ?

**बाबा**—असं ? तुम्हीं बातमी काढायला आलां आहांत ? मी त्यांचा बाप आहें, याची आठवण आहे का तुम्हांला ? जावयासाठीं का होईना, पण पोरीच्या गळ्याला तांत लावायला कुठला बाप तयार होईल ? ( विजया येते. ) ही पहा—त्यांतली एक आली.

**विजया**—बाबासाहेब, विरोधी पक्षाचीं माणसं माझ्या ऑफिसांत कां ? तुम्हीं आमचे सेक्रेटरी आहांत याची आठवण आहे का तुम्हांला ?

**सर्वो०**—विजय, मी काय तुझा अपराध केला आहे ?

**विजया**—कुठल्याही स्त्रीचा अपराध, तोच माझा अपराध. आज आम्हीं

व्यक्ती नाहीं–विभूती आहेत. दरवाजा माहित आहे ना? जिन्यावरून उतरतांना संभाळून उतरा-पायरी चुकाल एकादी!

**सर्वो०**--एकादी कां? मूळ साऱ्याच पायऱ्या चुकलों आहोंत.

**विजया**--ती बजी कुठं गेली? तिला म्हणावं यांना रस्ता दाखीव–कीं मीच येऊं स्वतः रस्ता दाखवायला? इथं पोऱ्या नि शिपाई नसून पोरी शिपाइणी आहेत तें माहित आहे ना? चिंगे, यांनां रस्ता दाखीव पाहूं. (चिंगी येते) ऐकूं येतं आहे का?

**चिंगी**--काय हो, ऐकूं येतं आहे का? केरसुणी आहे का ओळखीची?

**बाबा**--हेरंयद्वारे शिवशिव शिवानां कलकलः! थकलेल्या सिंहावर कोल्हीं ओरडूं लागलीं!

**चिंगी**--कोण कोल्हीं? कोण सिंह? हीं असलीं बोलणीं मी सुद्धां ऐकून घ्यायची नाहीं बरं! पोरी झालें म्हणून काय झालं–या ऑफिसांत सत्ता माझी आहे

**विजया**--ऐकलंत सर्वोत्तमराव?

**सर्वो०**--ठीक! येतों—नमस्कार–( जातो. )

**बाबा**--भेकड! पापी मन असंच भित्रं असतं. मोलकरणीच्या पोरीला या एका काळच्या लखपतीनं भ्यावं का?

**विजया०** अजून पुरुषांचा कड येतो आहे.

**बाबा**—संवय आहे ना ती जुनीपुराणी? एकदम कशी मोडेल? पुढल्या पिढीला आतां द्या हे धडे!

**विजया**--पुढली पिढी आली होती का इकडे?

**बाबा**--कुठली पुढली पिढी? विसू का? तो कार्टो अगदींच बावळट आहे.

**विजया**--नाहीं बाबासाहेब, त्याचं अंतःकरण मी ओळखलं आहे. तों सर्वोत्तमराव नव्हे–तितकाच बावळटही नव्हे! त्याला दुःख द्यावं असा माझा हेतू नव्हता पण चुणूक दाखवल्यावांचून गत्यंतर नव्हतं. वडिलोपार्जित वाङ्निश्चय मोडून स्वतःच्या मनानं आपला संसारांतला भागिदार पारखून घेतला पाहिजे, हें त्याला पटवून द्यायचं होतं. अजून थोडीशी शंका आहे तिचं निराकरण व्हायची वाट पाहातें आहें.

**बाबा**—नको विजू, त्या भोळ्या जीवाला यापेक्षां जास्त कष्ट देऊं नकोस. मीही पुरुषच आहें ना? पण तुमच्या बरोबरीनं-नव्हे तुमच्या हाताखालीं काम करायलादेखील तयार झालों. मला काय स्वाभिमान नाहीं? तुमच्यापेक्षांही मी अभिमानी आहें. पण तत्वासाठीं तुमची कड घेतली. माझी सारी दौलत मी या व्यापारासाठीं तुमच्या स्वाधीन केली. एका क्षणाच्या चुकीनं किंवा दैवाच्या फटक्यानं तिची राखरांगोळी होईल, हें माहित असूनही मी सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवलं, तें काय मी एक बायको होतों म्हणून?

**विजया**--सारेच पुरुष तुमच्यासारखे असते तर हें बंड का उभारलं गेलं असतं! पण या जगांत कांहीं नंदू आहेत, कांहीं सर्वोत्तमरावही आहेत! त्यांच्या विरुद्ध हें बंड आहे. आमच्या हातीं कायदा नाहीं- कायदे कौन्सिलांत आम्हांला जागा नाहीं-कधीं दिलीत तर शेंकडा एकादुसरी घाल-तेवढ्यानं झगड्याला तोंड कसं देणार?-म्हणूनच आम्हांला व्यापारांत शिरावं लागलं. कर्तबगारी दाखवायला कायदेकौन्सिलांपेक्षां बाजारपेठच जास्त चांगली. इथला न्याय हातोहात! जो हजीर तो इथं वजीर! आम्हीं उपाय शोधला, तो लागू पडला, यांतच आम्हांला आनंद आहे.

**बाबा**—आणि मलाही त्यांतच आनंद आहे. पण आतां याचा शेवट कसा होणार?

**विजया**—त्याची काळजी तुम्हांला नको. योगायोग असेल तर आजच त्याचा निकाल होईल. केसरबेननं आज एवढं मोठं एक धाडस केलं आहे, कीं तें यशस्वी झालं तर साऱ्या जगांत आम्हां बायकांचं नांव गाजेल.

( जीवनपुरी--एकताल. )

**कदु या अबला नामा। बलवान जगातिं या व्हाया। घे धीरा करिं कृपाण। साम दाम हें निशाण। आज सजलि हे रामा ॥धृ०॥ वीर पुरुष चाळविला। अवघा स्त्रीगण जमला। सांडुनि तनु वरुं विजया। या रण-संग्रामा ॥ १ ॥**

**बाबा**--ठीक आहे. याचि देहीं याचि डोळां एकदां मला कांहीं तरी अचाट करणी करून दाखवा. तुम्हांला यश मिळालेलं पाहीन आणि सुखानं डोळे मिटीन.

**विजया**—तसं कसं होईल ? आमच्या मुलीबाळींच्या व्यापारांत **अनुभवी** सेक्रेटरी कोण मिळणार मग ?

**बाबा**--एकूण मला तुम्हीं दादाभाई नवरोजी करणार तर ? ठीक आहे. तेंही होऊन जाऊं द्या. जगायचंच असलं तर 'मरतों" ह्मणूनही मरण येत नाहीं !

**विजया**—एवढं जगायचं ठरल्यावर आतां मरणाच्या गोष्टी कशाला ? ( कुंदा येते. ) आलीस ? सर्वोत्तमराव आले होते इथं—

**कुंदा**--मला कळलं तें-चिंगीनं सांगितली सारी हकीकत. आतां असं पहा बाबा, आज आणीबाणीचा दिवस आहे. आजचा डाव साधला तर एकट्या त्यांनाच काय-पण साऱ्या जगाला धडा मिळेल. वरदा आली का ?

**बाबा**--विचारूं का फोनवरून ?

**कुंदा**--कुठं विचारणार ? आज ती नुसती तळपते आहे. आजची वेळ अगदीं आणीबाणीची आहे. जगायचं कीं मरायचं तें आज ठरायचं आहे. देहांतली सारी शक्ती, तिजोरींतला सारा पैसा, पुरून ठेवलेलं सारं सोनं, आज खर्चीं घालायचं आहे. पुरुष श्रेष्ठ कीं स्त्री श्रेष्ठ हें ठरविण्यासाठीं आज जिवाचा होम करून ज्योत पाजळायची आहे. ( फोन वाजतो ) हॅलो-कोण ? वरदा का ? हं-आलों-चल, विजू-चल लवकर. ( दोघीही जातात. नंदू येतो, चिंगी त्याला आडवते. )

**नंदू**—थांबा म्हणतोना ! छेः गेल्याच ! या बायका बायका आहेत कीं आहेत तरी कोण ?

**बाबा**—अरे, एवढी घाई कसली तुझी ?

**नंदू**—अगदीं तरवार मारली आहे !

**बाबा**—आज काय वाटतं ?

**नंदू**--( कागदावर लिहून दाखवीत ) हा बसतो ?--

**बाबा**--फिट काय ?-हं-अगदीं ?-छेः हा तर ओपनिंग कट्-हा ? हा सुरत कट !—मला वाटतं तियालाच चान्स देऊं !

**नंदू**--अहो-तो तर कोलकट-

**बाबा**--कोलकट, फीचरकट, अमदाबाद कट, ब्रोच कट. या कटांच्या कटकटीनं विटलों बुवा ! हा ?-हा तर फेव्हरीट आहे. घटलेला आहे-शिवाय बाजार-

वाल्यांनीं दाबला आहे. तूं असं कर, आलेल्या आंकड्यावरचे सर्व पैसे दुसऱ्या आकड्यांवर फिरीव. या धंद्यांत खाणाऱ्याची जित आणि खेळणाऱ्याची हार असते हेंच खरं.

**नंदू**—खाण्याचं काय बोलतां ? मी आंकडा खात असतों आणि तशीच वेळ आली तर चिठ्ठयादेखील खातों—अगदीं गिळून खातों.

**बाबा**—बाकी तुझा आकडा खाणं आणि अफू खाणं सारखंच.

**नंदू**--असं कां म्हणतां ? आज जोगेश्वरीचा आंकडा आणला आहे, कल्याणचा आहे-आणि अगदीं फिटांतला फिट म्हणजे मस्तानचा आंकडा—तो देखील मिळवला आहे.

**बाबा**--आतां वाटेल तो लाव—पण शुअर लाव म्हणजे झालं. (सदोबा येतो.) काय झालं आहे रे ?

**सदोबा**--शेट कुठं आहेत ?

**बाबा**--कां ? घटकाभऱ्यापूर्वी इथंच होते.

**सदोबा**--आतां नाहींत ना ? सगळे ब्रोकर येऊन बसले आहेत आणि यांचा तर पत्ताच नाहीं.

**बाबा**--कोण येऊन बसले आहेत म्हटलंस ?

**सदोबा**--ते अडते-ब्रोकर—ऑडक्रित्ते ! तोडतातच लेकाचे एकेकाला ! खरे ब्रोकर आहेत. नंदू—

**नंदू**--चूप !—तुझं आमचं आतां फाटलं आहे. हरामखोर ! मला दगा देतो. तुला माहित आहे ? मीच तो बुवा होतों. कशी दिली ठोकर ! माझ्याशीं दगलबाजी करतों काय ?

**सदोबा**--आपण काय ? हुकमाचे ताबेदार ! तुम्हीं मरा—तुम्हीं मरा—आमचा पगार मिळाला पहिल्या तारखेला म्हणजे झालं. कोसळलाच शेट—तर या बिळा मारला खिळा चल जाऊं दुसऱ्या बिळा ! कुंदाबाईकडे नोकरी धरीन—ओळखच आहे ना पूर्वीची ?

**बाबा**--जा—जा—त्या तुझ्या शेटला हुडकून काढ. जींवबीव द्यायचा एकादा—अशाच वेळीं संभाळावं लागतं या लोकांना ! जा. ( सदोबा जातो ). या पोरी कुठं

गेल्या आहेत कळत नाहींत. सारख्या मोटार उडवीत फिरताहेत. त्या छोटीचा तर कुठं पत्ताच नाहीं.

**नंदू**--छोटी ? ती काय छोटी ? सर्वांपेक्षां बडी आहे ती. साडेतीन औंस वजनाची कारटी-साऱ्यांना नाचवते आहे ! पण बाबासाहेब, तुम्हांला माहित आहे ? एक दिवस मला तुमचा जांवई होण्याचा मान मिळणार आहे.

**बाबा**--गाढव आहेस ! बापाला विचारीत नाहीं-ती नवरा करणार आहे म्हणे ! नंदू, तिच्यावर विश्वास ठेऊं नकोस. ती लग्नवाल्या पोरींतली कार्टी नव्हे. ती कुणाचीच बायको होणार नाहीं-आणि तिला तर कुणाचा नवरा होतां येत नाहीं. ( वरदा येते. ) आलीस ?

**वरदा**--नाहीं अजून ! ( नंदूच्या पाठीवर थाप मारून ) तूं यांचं ऐकूं नकोस. मी सांगितलं आहे ना तुला ? माझ्यावर विश्वास ठेव. जा पाहूं आतां.

**नंदू**--कॉटन मार्केट की जय ! ( जातो. )

**वरदा**--या असल्या मूर्खांशीं मी लग्न करणार ! माझ्याबरोबर लग्न करणारा अजून जन्माला यायचा आहे. तेवढ्यासाठीं ब्रम्हदेव बसला आहे आंकडे मोडीत !

**बाबा**--बरं तें काय झालं ?

**वरदा**--सर्वांना ठेवलं आहे गुंडाळून ! अगदीं सारे ! तो सरूपचंद पोद्दार, पृथ्वीराज शिवनारायण, आनंदीलाल नेमाणि आणि मुनिलाल चोथा साऱ्यांना कसे घट्ट बांधून ठेवले आहेत. विसू कां अजून आला नाहीं ? त्याला जें काम दिलं आहे, तें आधीं झालं पाहिजे.

**बाबा**--मला एकच भीती वाटते आहे. हा आमचा गाढव जावई एकादेवेळीं अफूची गोळी शोधायचा.

**वरदा**--त्याची नको काळजी ! त्या कामावर ठेवला आहे जयवंताला. त्याच्याच मोटारींतून आज फिरताहेत ते ! ( विश्वनाथ येतो ) आलांत ? या. काय झालं ?

**विश्व०**--अगदीं ठीकठाक ! तुम्हीं चाळीस लाख गांसड्यांच्या अंदाजानं कॉर्नेरिंग करायचं ठरवलं आहे, असं सांगतांच तो खुष झाला. कांहीं कोटींची रक्कम होते आहे पण त्यालाही जोडीदार मिळाले आहेत. इकडे आंखांत लाखाला बुडाला आहे-( कुंदा व विजया येतात ) शेअर बाजारांत पक्की ठोकर बसली आहे-

**विजया**--किती जणांचा सत्यानाश होईल आज ? मन असं डाचूं लागतं ! कुणाची शिक्षा कुणाला मिळणार ही !

[ फोन वाजूं लागतात. एका एका फोनवर प्रत्येक जण ऑर्डर देऊं लागतात. विश्वनाथ आणि बाबासाहेब तटस्थपणें पाहातात. ]

**बाबा**--पाहिल्यास ? कशा तळपताहेत ! एक सत्वगुणी, एक रजोगुणी आणि एक मूर्तिमंत तमोगुणाची सात्विक पुतळी ! पाहात असतांना वाटतं, कीं तीन गुणांची ही जागती ज्योत धगधगतांना पाहात पाहात मरून जावं !–

**वरदा**--( पुढें येऊन ) मरायच्या गोष्टी बोलायला अजून पुष्कळ अवकाश आहे बाबा ! आधीं–

**बाबा**--थांब–एकीनं मला दादाभाई नौरोजी केलं आहे आणखी तुम्हीं एकेक जणी वय वाढवूं लागलांत तर मला वाल्या कोळ्याचा वाल्मिकी करून एक वारूळ चढवाल माझ्यावर ! नको, बाई ग, नको फार दिवस जगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुम्हां पोरींची ही जागती ज्योत तेवते आहे तोंवरच हा जुना लामणदिवा मालवलेला बरा !

**विश्व०**--देव करो आणि तुम्हांला उदंड आयुष्य होवो. असल्या ज्योती ज्या खाणींतन निघाल्या ती खाण अशी अकालीं मालवणारच नाहीं.

**बाबा**--काय झालं ग पोरींनो ?

**कुंदा**--सारी तयारी जय्यत आहे. आतां नुसती तोफ डागायची. चल वरू– आपण आफिसांत जाऊं--

**वरदा**--आणि तुम्ही चला हो सेक्रेटरी ! आणि विजू, या विजयाची पहिली बातमी ऐकायला इथं विजयाच पाहिजे, म्हणून तूं इथंच राहा. ( दोघाखेरीज सर्व जातात पण वरदा परतून येते. ) आणि अहो गंवडी, हिला जरा सोबत करा बरं का ? आमचं नवं घर उभारताना पहिली वीट तुमच्याच हातून लागली पाहिजे. ( जाते–क्षणभर दोघेंही स्तब्ध. )

**विश्व०**--विजू—

**विजया**--विसू–

**विश्व०**--विजू, आतां तरी खात्री झाली ना ?

**विजया**--कसली ?

**विश्व०**--कीं लग्न झाल्यावर नवरेशाहीचा सुलतान माझ्याठायीं जागा होणार नाहीं ह्मणून.

**विजया**--अजून कसं सांगतां येईल ? हा प्रयत्न आहे-परिणाम नव्हे. परिणामानं प्रत्यंतर येणार आहे, प्रत्यंतर आलं, कीं मग तुला निर्णय ठरवतां येईल. तोंपर्यंत—

**विश्व०**--नाहीं विजू, मला प्रत्यंतर आलं. खरं पाहिलं तर या प्रत्यंतराची मला जरूरच नव्हती--

**विजया**--पण जगाला त्याची जरूरी होती. राजकारण सारं फोल आहे भिकाऱ्याच्या राजकारणाला विचारतं कोण ? परस्वाधीन राजकारणाचे लोडेड फांसे टाकित बसण्यापेक्षां व्यापाराचा लगाम हातीं आला, तर सारं जग पायाशीं येईल; हें या मूर्ख पुरूषजातीला पटवून द्यायचं आहे.

**विश्व०**--तुझं ह्मणणं खरं आहे. आह्मां महाराष्ट्रीयांना वाङ्मयाचा मोठा अभिमान आहे, राजकारणांतले आपण खंदे वीर आहोंत अशी बडाई मिरवित, कित्येक वर्षे आम्हीं स्वतःला फसवित आलों आहोंत. व्यापाराची पर्वा आम्हीं केली नाहीं–नव्हे व्यापाऱ्यांची आम्हीं थट्टा केली–पण व्यापाराच्या उद्धाराशिवाय देशाचा उद्धार नाहीं, हें कळायला स्त्रीजातीच्या कर्तबगारीची जागती ज्योतच तेवली पाहिजे, हें आज मला कळलं ! केवढा एकेकीचा उत्साह ! आणि आम्हीं पुरूष !

**विजया**--असं कां स्वतःला कमी लेखतां ? तुमचा दांभिकपणा आड येतो आहे. हा खोटा अभिमान सोडलात तर दांभिकपणाही आपोआप जाईल, पुरुष आणि प्रकृती समभाव होतील आणि त्याबरोबरच या जगाचा उद्धार होईल.

( **कर्णाटकी–तोडी**--त्रिताल. )

**जगिं आभास हा दाविला । वितराग तो झणिं मालविला ॥ धृ० ॥ उगाचि विकास दुरावला । धादांत वेदांत खुळावला । करगत हरविलि झळकत मिरविलि अविरत दिपविलि प्रतिभा अमला ॥ १ ॥**

( आंत मोटरहॉर्न वाजतात ) आल्या वाटतं ? ( कुंदा, वरदा, बाबासाहेब येतात. ) काय झालं ? ( कुंदा खिन्न होऊन बसते.) कुंदे, काय झालं ? आपण फेल झालों का ?

**वरदा**--नाहीं. आपण यशस्वी झालों !

**विजया**—मग ही सुमी अशी खिन्न कां ?

**वरदा**—म्हणूनच.

**विश्व०**—यश आलं म्हणून ?

**वरदा**--होय. नुसतं यश नव्हे–एका सर्वोत्तमरावावर जय मिळविला म्हणून नव्हे–आज जगावर आम्हीं जय मिळवला आहे. काय केलं माहित आहे ? पण तुला सांगण्यांत काय अर्थ ? तुला गवंड्याला काय कळणार त्यांत ?

**बाबा**--मी सांगतों. ऐक. त्याचाही हात लागला आहे तिथं ! गंवड्याला देखील अक्कल असते–निदान ऐकण्यापुरती. ऐक. रूझवेल्ट प्रेसिडेंट येणार हें कळतांच कपाशीचा भाव वधारूं लागला. वुमन्स कॉटन सिंडिकेटनं खरेदीला सुरवात केलेली पाहातांच सर्वोत्तमरावाची सिंडिकेट सरसावली. खरेदी थांबवून विक्रीला आम्हीं सुरवात केली. आमचा अंदाज तूं त्यांना दिलाच होतास, त्या जोरावर त्यांनीं खरेदीचा सपाटा लावला. आम्हीं हटूं लागलों असं पाहून त्यांना चेव आला. आमची माहिती कांटेकोर होती. आम्हीं बँकावर विश्वास ठेवला नाहीं. बँका केव्हांही घातकीच. विक्री केली कीं सोनं घ्यायचं, हा आमचा बाणा. कोटीनीं कपास विकली आणि कोटीनं सोन्याच्या लगड्या पाडल्या. कॉटन मार्केट त्यांनीं कॉर्नर केला. पण प्रत्यक्ष डिलिव्हरीची वेळ येतांच त्यांचे डोळे उघडले. त्यांचा अंदाज होता चाळिस लाख गासड्यांचा, पण जाग्यावर होत्या साठ लाख ! थकले. साठ लाखांच्या किंमतीची त्यांची तयारी नव्हती. आमची तयारी होतीच–शिवाय सोन्याचा आम्हांला पाठिंबा होता. त्यावर रकम उभी केली. भाव उतरला आणि साऱ्या साठलाख गांसड्या कॉर्नर केल्या. सर्वोत्तमराव सिंडिकेटसकट खलास झाले.

**सर्वो०**--( प्र. क ) होय–खलास झालों. धुतल्या जिभेनं कबूल करतों, कीं मी खलास झालों. पण त्याला कारण हा हरामखोर ! तूं–विश्वनाथ–तूं माझा गळा कापलास ! ( नंदू व जयवंत येतात. ) आणि तूं—

**नंदू**—होय मीही ! विश्वनाथपंताची काय चूक ? एवढ्याशा आंखफरखासाठीं

तुम्ही माझा गळा कापायला उठलांत, तेव्हां कसं वाटलं होतं ! अगदीं सवा हात तुरा लावल्यासारखं वाटलं होत नाहीं ?

**सदो०**--खरं आहे. मित्र हो, तुम्हां सर्वांची मी क्षमा मागतों. पुरूष, स्त्रिया-शत्रू, मित्र-व्यापारी, भिकारी- साऱ्यांची मी क्षमा मागतों. सर्वांच्या चरणांवर मस्तक ठेवून-( डबी काढतो. कुंदा त्याचा हात धरते ) सोड-अफू दिल्याशिवाय तूं मला मारलं आहेस !

**कुंदा**--नाहीं. वुमन्स कॉटन सिंडिकेटनं स्पेशल ठराव करून तुम्हांला भागिदार म्हणून घेतलं आहे.

**विजया**--यशाचा फुकटा वांटेकरी म्हणून नव्हे-कुंदेचा नवरा म्हणून नव्हे-तर चांगला भांडवलवाला रोखीचा भागीदार, कामाचा जोडिदार, म्हणून कुंदेनं आपल्या वांट्याचा वांटा देऊन तुम्हांला भागीदार घेतलं आहे.

**कुंदा**--आतां या पुढं आंखफरक बंद. जुगार बंद. समजलं ? व्यापाराच्या प्रामाणिक चढाओढींत कधींही खूट पडत नाहीं. तुम्हांला नडतात, ते हे असले जुगार !

**वरदा**--कळलं ना नंदू ?

**नंदू**--कळून काय उपयोग ? पोटाला कांहीं हवं ना ?

**विश्व०**--तर मग हा जुगार सोड. टाइपरायटिंग शीक-शॉर्टहॅन्ड शीक-कुठं तरी नोकरी कर.

**नंदू**--पण त्यानं एकदम श्रीमंत कसं होतां येणार ? वरदेनं कबूल केलं आहे.--

**वरदा**--कांहीं नाहीं कबूल केलं !-

**जयवंत**--आणि मी-

**वरदा**--तूंही बैस मोटार धूत--

**सदोबा**--पाहिलंत ? कशी फसगत झाली ? हा एकटा जीवच शेवटीं सदाशिव ठरला ना ?

**विश्व०**--आणि मी--

**वरदा**--तूंही मोठं घर बांध. घर उभं राहिलं, कीं विजया येतेच आहे तिथं राहायला ! होय ना ?

**नंदू**—असं फसवलंस का ?

**वरदा**—नाहीं. तुम्हीं आपण होऊनच फसलांत, त्याला मी काय करूं ? ही वरदा अनादी आहे, अनंत आहे, स्वयंसिद्ध आहे तशीच स्वयंजीवी आहे, अनादीकाला-पासून जगाच्या उद्धारासाठीं मातृरूपानं अवतरणारी ही स्त्री, कुणाला दास करणार नाहीं किंवा कुणाची दासीही होणार नाहीं.

**वंदेमातरम्**

**सुजलाम् सुफलाम् मलयज शीतलाम्**

**शस्यशामलाम् मातरम्**

**वंदेमातरम्**

**ॐतत्सत**